# संततिनियमन

## विचार व आचार

तिसरी आवृत्ति



र. धो. कर्वे.



किंमत बारा आणे

सामाजिक आरोग्यमालाः पुस्तक २ रें

# गुप्त रोगांपासून बचाव

## ( विचार व आचार )

लेखक :-प्रो. र. धों. कर्वे, एम् ए.

किंमत बारा आणे

राइट एजन्सी, २० भटवाडी रस्ता,
गिरगांव, मुंबई.

सामाजिक आरोग्यमाला–पुस्तक १ लें

# संततिनियमन

## विचार व आचार





तिसरी आवृत्ति

---

लेखक,

**र. धों. कर्वे, एम्. ए.,**

डिप्लोम् द एत्युद् स्युपेरिअर ( पॅरिस् )

**किंमत १२ आणे**

मुद्रक—बी. जी. गण्डभीर, न्यू आर्ट अ‍ॅण्ड लिथो वर्क्स,
सूर्यमहाल ठाकुरद्वार मुं. नं. ४.

प्रकाशक—र. धों. कर्वे, राइट् एजन्सी,
नं. २०, भटवाडी रस्ता, गिरगांव, मुंबई.

पुणें येथें हें पुस्तक डेक्कन जिमखान्याच्या आवारांत
डॉ. दि. धों. कर्वे यांजकडे विकत मिळण्याची
मुद्दाम सोय केली आहे.

# अनुक्रमणिका.



# पहिल्या आवृत्तीवर अभिप्राय.

प्रसिद्ध नाटककार श्रीयुत श्री. कृ. कोल्हटकर म्हणतातः—

'संततिनियमन' हें पुस्तक मीं काळजीपूर्वक वाचिलें. या पुस्तकांत तुरगब्रम्हचर्याचे दुष्परिणाम आणि शारीरिक सुस्थितीच्या दृष्टीनें विवाहाची व सांपत्तिक सुस्थितीच्या दृष्टीनें संततिनियमनाची आवश्यकता कर्त्यानें उपपत्तीसह, आकृतींसह व उदाहरणांसह थोडक्यांत पण परिणामकारक रीतीनें दर्शविण्याचा प्रयत्न केला असून तो पूर्णपणें सिद्धीस गेला आहे. तरुण पिढीच्या शारीरिक व सांपत्तिक स्वास्थ्याचे योग्य उपाय निजपुढें स्पष्टपणें व धीटपणें मांडल्याबद्दल मी कर्त्याचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. एका अत्यंत उपयुक्त विषयाची सांगोपांग चर्चा केल्यामुळें पुस्तक उद्बोधक जसें झालें आहे तसें चटकदार व विनोदी भाषेमुळें तें मनोरंजकही झालें आहे. तरुणांस तें निःसंशय संग्राह्य वाटेल.

३–६–२५ श्री. कृ. कोल्हटकर

प्रसिद्ध इतिहासकार श्री. गो. स. सरदेसाई म्हणतातः—

प्रो. रघुनाथ धोंडो कर्वे यांचें संततिनियमन हें पुस्तक मीं पूर्वीच मोठ्या आस्थेनें वाचलें होतें. त्यांनीं ज्या सामाजिक प्रश्नाचा व्यासंग चालविला आहे, ते आजच्या परिस्थितींत अत्यंत विचारणीय असून, त्या संबंधानें मीही आपल्यापरी आज कैक

वंप लिहीत व विचार करीत आलों आहें. संततिनियमनाचा प्रो. कर्व्यांचा विषय ' सुप्रजाजनन ' शास्त्राचें एक अंग आहे. हल्लीं पाश्चात्य राष्ट्रांशीं आपली चढाओढ चाललेली असून, तींत आपला प्रत्येक इसम सामर्थ्यानें पाश्चात्य इसमाच्या बरोबरीचा झाल्याशिवाय, आपल्या राष्ट्राचा निभाव लागणें शक्य नाहीं. नाहींतर कीडमुंगीसारखीं आपलीं दुबळ माणसें केव्हांच चिरडून जातील. प्राचीन शास्त्रांतलीं वैवाहिक बंधनें कितीही इष्ट असलीं तरी हल्लींच्या जीवनकलहांत तीं कितीशीं शक्य कोटींतलीं आहेत याचाही विचार सुज्ञांकडून झाला पाहिजे. नुसतें प्राचीन काळच्या स्थितीचें रम्य चित्र डोळ्यांपुढें ठेवून आपलें भागणार नाहीं. पाश्चात्यांच्या संसर्गानें अनेक बरे वाईट प्रकार आपल्या राहणींत घडत आहेत, त्यांच्या संबंधानें आपणास लागू पडणारी उपाय-योजनाही आपण जरूर स्वीकारली पाहिजे. त्यासाठीं प्रो. कर्व्यांचें हें पुस्तक सर्वांनीं शांतपणें वाचून विचारांत घ्यावें, आणि त्यापुढची पायरी जें सुप्रजाजनन, तें शक्य तितकें प्रचारांत आणण्याचा उद्योग प्रत्येकानें आपल्या सोयीप्रमाणें सुरू करावा, असें मला वाटतें. निदान अनिष्ट प्रकारांकडे डोळेझांक करून बिलकूल चालणार नाहीं, आणि ' संततिनियमन ' या शब्दां-नींच केवळ भिऊन जाऊं नये, एवढेंच मला सांगणें आहे.

ता. ७।३।१९२५ **गो. स. सरदेसाई.**

# चार प्रास्ताविक शब्द.



जुनें आणि नवें यांची नेहमींच लढाई चाललेली असते व त्याप्रमाणें ती आजही चालू आहे. मात्र खरोखर नवें काय व जुनें काय याची कल्पना फारशा लोकांस नसते. वैदिक कालीं ब्राह्मण मांसभक्षण करीत होते याबद्दल फारसा वाद नाहीं, परंतु आज मांसभक्षण करणारा ब्राह्मण जुन्यांत खास मोडणार नाही. बहुजनसमाज ज्या गोष्टी आज करतो त्या जुन्या, ज्या करीत नाहीं त्या नव्या, असाच अर्थ समजला जाऊन तदनुसार जुन्याचें समर्थन व नव्याची चेष्टा बहुजनसमाजाकडून होत असते.

या निबंधांत आम्ही जे विचार वाचकांपुढें मांडणार आहों, ते आज जरी समाजांत प्रचलित नसले, तरी वास्तविक पाहतां ते अत्यंत जुने आहेत इतकेंच नव्हे, तर या विचारांचा उगम हिंदुस्थानांत आहे. या विचारांची सत्यता आमच्या पूर्वजांस स्पष्ट भासत होती व आजची निकृष्ट स्थिति आपणांस प्राप्त होण्यास त्या विचारांची विस्मृति हें एक कारण आहे.

संततिनियमनाचे विचारच काय परंतु त्याचे उपायही अनेक संस्कृत ग्रंथांत सांपडतात. बृहदारण्यकोपनिषदांतील अशा प्रकारचा एक मंत्र एका गृहस्थांनीं आमचेकडे पाठविला आहे. मंत्रांसारखे काल्पनिक उपाय सोडून दिले तरी औषधी उपायही कित्येक ग्रंथांत सांपडतात. ( उदाहरणार्थ—त्रिमल्लकृत बृहद्योगतरंगिणी, तरंग १४३ श्लोक ५३-६३ पहा ) डॉ. मेरी स्टोपस् यांनीं आपल्या 'Contraception' नांवाच्या नवीन ग्रंथांत यासंबंधानें आपलें मत असें दिलें आहे कीं इतर सर्व लोकांनीं या विषयावरील माहिती प्राचीन काळीं हिंदवासीयांकडून घेतली असली पाहिजे.

अशा प्रकारचे पूर्वजांचे समाजोपयोगी विचार विसरून जाऊन सहगमनासारख्या रानटी चाली मात्र शेंकडों वर्षे शिल्लक राहाव्या ही अत्यंत खेदजनक गोष्ट आहे. हे विचार पुनः एकवार लोकांच्या निदर्शनास आणून ते नवीन शास्त्रीय पद्धतीच्या कसोटीस कसे उतरतात हें दाखविण्याचा आमचा विचार आहे. अर्थात् आतां-पर्यंत उपलब्ध असलेली शास्त्रीय माहिती व तदनुरूप शास्त्रीय उपायच येथें दिले आहेत.

बहुजनसमाजास पसंत असलेलेच विचार वाचकांपुढें मांडण्यानें

समाजिक प्रगतीस कोणत्याही प्रकारची मदत होत नाहीं. ज्यांना स्वतंत्र रीतीनें विचार करण्याची शक्ति आहे, परंपरेच्या अदृश्य शृंखलांनीं जे जखडलेले नाहींत, त्यांनीं आपले विचार लोकांपुढें मांडण्याचा शक्त्यनुरूप प्रयत्न केला पाहिजे, मग ते समाजास पटोत कीं न पटोत. अर्थात् या कामांत कधीं कधीं छापखानेवाल्यांचा हेकेखोरपणा व कधीं कधीं तर कायदा सुद्धां आड येण्याचा संभव असतो. विचारी लोकांपेक्षां पारंपरिक लोकांचीच संख्या नेहमीं जास्त असल्यामुळें व कायदे बहुमतानें होत असल्यामुळें कायदेही बहुतांशीं पारंपरिकच असतात. परंतु कायद्याविरुद्ध मतें कोणींही प्रतिपादन न केल्यास कायदे कधींही बदलणें शक्य नाहीं. म्हणूनच कायदे व रूढि यांवर कडक टीका करणाऱ्या लेखकांचा सामाजिक प्रगतीच्या दृष्टीनें अत्यंत उपयोग असतो. अशा लेखकांत गणना करून घेण्याची इच्छाच प्रस्तुत प्रयत्नाच्या मुळाशीं आहे.

पहिल्या भागांत संततिनियमनाचे फायदे दाखवून आक्षेपांस उत्तरें दिलीं आहेत. दुसऱ्या भागांत संततिनियमनाचे शास्त्रीय उपाय दिले आहेत. ते समजावे म्हणून एकंदर बाग आकृति

घातल्या आहेत, ब्रह्मचर्यावर एक पुरवणी जोडली आहे व त्यांत आधुनिक विद्वानांचे विचार एकत्र केले आहेत. दुसरी पुरवणी मालथसच्या कांहीं आधुनिक प्रतिपक्ष्यांस उत्तरादाखल आहे.

गिरगांव, मुंबई,
आक्टोबर १९२३.

र. धों. कर्वे.

---

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



या पुस्तकाची दुसरी आवृत्ति इतक्या लवकर काढावी लागेल अशी कल्पना नव्हती. काल्पनिक लोकमतास भिऊन येथील **मासिक मनोरंजन** छापखान्याच्या चालकांनीं पुस्तकाची पहिली आवृत्ति छापण्याचें नाकारलें. त्याचप्रमाणें मासिक मनोरंजन, मॉडर्न रिव्ह्यू, केसरी व इतर मागसलेल्या मासिकांच्या व साप्ताहिकांच्या पारंपरिकतेमुळें अशा पुस्तकांची जाहिरात देणें सुद्धां कठिण होऊन बसतें. तरी पण या विषयाचें ज्ञान राष्ट्राच्या दृष्टीनें महत्वाचें आहे इतकेंच नव्हे तर या संबंधीं अज्ञानामुळें पुष्कळ लोकांचे इतके हाल होतात कीं संततीस प्रतिबंध करणें शक्य आहे इतकें कळण्याचा अवकाश, मनुष्य हें ज्ञान मिळविण्या· करतां हरप्रयत्न करीत असतो, आणि म्हणूनच ही दुसरी आवृत्ति काढण्याची वेळ आली आहे. 'किर्लोस्कर खबर' मासिकानें जाहिरात स्वीकारून या कामीं पुष्कळ मदत केली, व कित्येक सन्मान्य गृहस्थांनीं या विषयाचें महत्त्व समजून मार्मिक पत्रें

लिहून लेखकास प्रोत्साहन दिलें, याबद्दल ग्रंथकर्ता या सर्वांचा आभारी आहे. त्याचप्रमाणें ' मॉडर्न रिव्ह्यू ' मासिकाचे मराठी पुस्तकांचे परीक्षक श्री. वा. गो. आपटे यांनीं या पुस्तकावर जोराची प्रतिकूल टीका करून, इच्छेविरुद्ध कां होईना, पुस्तकाच्या खपास जोर आणला याबद्दल त्यांचेही आभार मानणें जरूर आहे.

या आवृत्तींत कांहीं आकृतींत फेरबदल केला आहे व कांहीं नवीन घातल्या आहेत. कांहीं ठिकाणीं अर्थ जास्त स्पष्ट करण्याकरितां शाब्दिक फरक केला आहे व कांहीं ठिकाणीं नवीन मजकूर घातला आहे.

संस्कृत लेखकांनीं सांगितलेल्या संततिनियमनाच्या उपायांबद्दल कांहीं वाचकांनीं जिज्ञासा दर्शविल्यावरून कांहीं उतारे पुरवणींत दिले आहेत.

गिरगांव, मुंबई.
१० जून १९२५.

र. धों. कर्वे.

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

या पुस्तकाची दुसरी आवृत्ति निघाल्यानंतर थोड्याच दिवसांनीं प्रो. ना. सि. फडके यांनीं एक ग्रंथ प्रसिद्ध करून त्यास याच पुस्तकाचें नांव दिलें. हा प्रकार फारसा प्रामाणिकपणाचा नाहीं हें खरें, तथापि 'एको हि दोषो गुणसन्निपाते निमज्जतींदोः किरणेष्विवांकः' या न्यायानें, आपल्या उज्ज्वल कीर्तीमुळें हा दोष लपून जाईल असें त्यांस कदाचित वाटलें असेल, किंवा नवीन नांव शोधून काढण्यास लागणाऱ्या कल्पकतेच्या अभावामुळें त्यांनीं तसें केलें असेल. परंतु हें पुस्तक त्यांनीं कां लिहिलें, याचा मात्र उलगडा होणें कठिण आहे. हा विषय त्यांस अवगत आहे असें त्यांच्या पुस्तकावरून दिसत नाहीं. आम्हांस आमच्या पुस्तकापासून बराच आर्थिक लाभ झाला असावा अशी त्यांची कदाचित् चुकीची कल्पना झाली असेल, व आमच्याच पुस्तकाचें नांव त्यांनीं परवानगीशिवाय उचलल्यामुळें या तर्कास दुजोरा येतो. किंवा ते धंदेवाले लेखक असल्यामुळें अशा मह-

त्याच्या विषयावर आपलेंही एखादें पुस्तक असणें जरूर आहे, असेंही त्यांस वाटलें असेल. कांहीं असलें तरी त्यांनीं आमचें अनुकरण करण्याचा प्रयत्न करून आमची जी नकळत स्तुति केली आहे, तीबद्दल आम्ही आभारी आहों.

तरी पण शास्त्रीय विषयावर ग्रंथ लिहिणें म्हणजे कादंबरी लिहिणें नव्हे, हें अशा कसलेल्या लेखकाला कळावयास पाहिजे होतें ज्या चुका कादंबरींत क्षम्य असतात, त्या शास्त्रीय ग्रंथांत हास्यास्पद होतात. व त्याच चुका त्यांनीं आपल्या नवीन इंग्रजी ग्रंथांत पुनः केल्यामुळें त्या नजरचुकीनें राहिल्या असें म्हणण्यासही आतां जागा राहिलेली नाहीं. अशा रीतीनें अजाण वाचकांच्या भलत्याच कल्पना करून देणें अक्षम्य आहे. किंवा 'वाचमर्थोऽनुधावति' या न्यायानें, आपल्यासारख्या लेखणीबहाद्दरानें ठोकून दिलेले सिद्धांत शास्त्रीय दृष्ट्याही आपोआप खरेच होतील, अशी तर त्यांची कल्पना झाली नसेल ?

आमचें पुस्तक प्रसिद्ध होईपर्यंत निदान मराठींत तरी या विषयावर पुस्तक नव्हतें. तेव्हांपासूनच्या गेल्या पांच वर्षांत

लोकांचीं मतें बरींच बदललीं आहेत. शिशुसप्ताहवाल्यांनींही आतां आमचीच बाजू घेतली आहे, व प्रथम संततिनियमनाविरुद्ध बोलणारे कांहीं विद्वान आतां आमच्या बाजूनें बोलूं लागले आहेत. यंदांच्या शिशुसप्ताहाच्या कमिटीनें मुद्दाम याकरतां एक चित्रपट तयार करवला. येथील सिनेमा सेन्सर्स बोर्डानें आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करून तो दाबून टाकण्याचा प्रयत्न केला, परंतु लेडी विल्सन या कमिटीच्या प्रेसिडेंट असल्यामुळें सरकारनें बोर्डाचा निकालच दाबून टाकून चित्रपटास परवानगी दिली. लेडी विल्सन् येथें आहेत तोंपर्यंत तरी आमचे बाजूस बरेच लोक असणार !

या आवृत्तींत एक आकृति अधिक घातली आहे व आधुनिक शास्त्रीय ज्ञानाचे दृष्टीनें जरूर तेथें फेरफार केले आहेत. जरूर वाटली तेथें अधिक स्पष्टीकरणही दिलें आहे.

गिरगांव, मुंबई, १ जून १९२८. र. धों. कर्वे.

—— o ——

# संततिनियमन.

## विचार व आचार.



## भाग १ ला—विचार.



### १

### विचारसरणी.

या छोटया निबंधाच्या आरंभीं यांतील विचारसरणीची वाचकांस थोडीशी ओळख करून देणें जरूर आहे. हा विषय जगांतील सर्व लोकांस सारखाच महत्त्वाचा असल्यामुळें धर्म व रूढी घटकाभर बाजूला ठेवून अर्वाचीन शास्त्रीय पद्धतीनेंच याचा विचार करणें इष्ट आहे. याचें कारण असें कीं धर्म अनेक आहेत व रूढि देशकालमानावर अवलंबून असते. आधुनिक

शास्त्रीय ज्ञान अशा प्रकारचें नाहीं, म्हणजे शास्त्रीय तत्वें सर्वांना सारखींच लागू आहेत. मुसलमानी धर्माप्रमाणें एका पुरुषास चार स्त्रियांशीं विवाह करतां येतात. परंतु ख्रिस्ती धर्माचे अनुयायी तें महापातक समजतात. पण मुसलमान असो कीं ख्रिस्ती असो, त्यानें विस्तवांत हात घातला कीं तो भाजणारच. तेव्हां सर्वसामान्य सिद्धांत जर शोधून काढणें असेल तर धर्म व रूढि क्षणभर विसरलें पाहिजे हें उघड आहे. ' नहि सत्यात् परो धर्मः, ' व हाच धर्म येथें पाळला पाहिजे.

इतकें ठरल्यावर ऐहिक सुखासच या निबंधांत महत्व दिलें आहे हे निराळें सांगावयास नको. कारण ऐहिक सुख हेंच सर्वमान्य आहे व त्याच्याच मागें सर्व लोक लागतात. ' ऐहिक सुख तुच्छ आहे, त्याच्या मागें लागण्यांत कांहीं अर्थ नाहीं, शरीरास जितके क्लेश भोगावे लागतील तितकी अधिक पुण्यप्राप्ति होईल ' अशी ज्यांची खरोखर समजूत असेल, त्यांकरतां हा लेख नाहीं. परंतु बहुतेक लोकांची समजुत, निदान त्यांचें आचरण याच्या उलट असतें, व असणें स्वाभाविक आहे. पारलौकिक सुखावर भिस्त ठेवणें म्हणजे हातचें सोडून पळ-

त्याच्या मार्गे लागण्यासारखें आहे. यासाठीं ऐहिक सुखाच्या साधनांचा विचार करणें इष्ट आहे, व हा उद्देश ज्यांना मान्य असेल त्यांकरतांच हा लेख लिहिला आहे.

त्याचप्रमाणें ' आमचे पूर्वज मूर्ख होते कीं काय ? ते ज्या गोष्टी करीत आले त्याच आम्ही चालविल्या पाहिजेत, त्यांना जीं तत्त्वें मान्य होतीं तींच आम्हांसही असलीं पाहिजेत ' इत्यादि कोटिक्रम ज्यांना पटत असेल, त्यांकरितां हा लेख नाहीं. पूर्वजांपेक्षां निराळ्या तऱ्हेनें आपण वागलों तरी आपले पूर्वज मूर्ख ठरत नाहींत; पूर्वजांच्या वेळीं जी परिस्थिति असेल व जें ज्ञान उपलब्ध असेल त्यांस अनुलक्षून त्यांनीं प्रत्येक गोष्टीचा विचार केला असेल व त्याप्रमाणें आपलें धोरण ठरविलें असेल. आपली परिस्थिति अर्थातच भिन्न आहे, व हल्लीं उपलब्ध असलेलें शास्त्रीय ज्ञान प्राचीन ज्ञानापेक्षां निःसंशय जास्त आहे; तेव्हां योग्य विचार केल्याशिवाय पूर्वजांनीं केलेल्या गोष्टी जर आपण करूं लागलों तर आपण मात्र मूर्ख ठरूं, अशी ज्यांची खात्री असेल त्यांकरितां हा लेख आहे. ' पुराणमित्येव न साधु सर्वम् ' या कविवचनांत सांगितल्याप्रमाणें जुनें तितके

सर्वच चांगलें नसतें व नवें तितकें वाईटही नसतें. तथ ज्यांना वाटत असेल त्यांनीं खुशाल ' ईश्वरभजनांत काळ कंठावा. ' त्यांना हा निबंध वाचण्याचें कारण नाहीं.

तरी पण ऐहिक सुखावर अगदींच पाणी सोडणारा मानव हजारांत एकही सांपडणें मुष्किल, आणि म्हणूनच कुबेराची संपत्ति ज्यांच्या जवळ नाहीं त्या सर्वांना या निबंधाच्या दुसऱ्या भागाचा व्यवहारदृष्ट्या उपयोग होण्याचा संभव आहे, मग आमची विचारसरणी त्यांना कबूल असो वा नसो.



## २

## ईश्वरी व मानवी शक्ति.

मनुष्याच्या इच्छेच्या मानानें मनुष्याची शक्ति प्राचीन काळींही अत्यंत मर्यादित होती व अजूनही ती अत्यंत मर्यादित आहे हें निर्विवाद आहे. ईश्वरी इच्छेशिवाय जगांत कोणतीही गोष्ट घडत नाहीं अशी जरी धार्मिक लोकांची समजूत असते, तरीही ज्या गोष्टी मानवी शक्तीच्या पलीकडे असतात त्यांसंबंधींच विशेषतः ईश्वरी शक्तीची कल्पना मनांत येते, व ज्या गोष्टी मनुष्याच्या अंगवळणीं पडतात त्या मानवी शक्तीच्या आधीन आहेत अशी कल्पना साधारणतः दिसून येते. प्राचीन काळीं विद्युच्छक्ति सर्वथैव ईश्वराधीन भासली असेल, परंतु आतां ती बरीचशी मनुष्याच्या आटोक्यांत आली आहे. बटन दाबल्यानें दिवा लागणें हा ईश्वरी चमत्कार आहे अशी कल्पना आपल्या मनांत क्वचितच येते. त्याचप्रमाणें संततीची गोष्ट आहे. असे रानटी लोक अजून सांपडतात कीं ज्यांना संतति होणें हा अकल्पित घडून येणारा दैवी चमत्कार वाटतो, व त्यांना या-

पलीकडे या गोष्टीचा कार्यकारणसंबंध बिलकूल माहीत नसतो. अशा रानटी स्थितींतून जरी हल्लीं बहुतेक लोक पार पडले आहेत, तरी संतति होणें न होणें अजूनही मनुष्याच्या ताब्यांत पूर्णपणें न आल्यामुळें पुष्कळ लोकांस त्यांत ईश्वरी शक्ति दिसते. प्राचीन काळीं ताप येणें म्हणजे सुद्धां ईश्वरी कोप किंवा भुताटकीचा प्रकार समजला जात असे. परंतु तो औषधोपचारानें बरा होऊं लागल्यापासुन त्यांतील भुताटकी बरीच कमी झाली आहे. गर्भधारणा व तत्संबंधी इतर गोष्टींबद्दल अशिक्षितच काय परंतु सुशिक्षित लोकांमधेंही बरेंच अज्ञान दिसून येतें व म्हणूनच या प्रकारामधें अजून बराच ईश्वरी चमत्कार शिल्लक राहिला आहे, व सिद्धमांत्रिकांच्या मंतरलेल्या ताईत दोऱ्यांचा खप जारीनें सुरू आहे आणि संततीकरितां नवस वगैरे प्रकार चालू आहेत. आतां हेंही खरें आहे कीं वंध्येस संतान होण्यास नवस ज्याप्रमाणें निरुपयोगी त्याचप्रमाणें शास्त्रीय ज्ञानही जवळ जवळ निरुपयोगी आहे. 'जवळ जवळ' म्हणण्याचें कारण याही बाबतींत शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग कधीं कधीं होऊं शकतो. परंतु इच्छा नसल्यास गर्भधारणा होऊं न देणें हें मात्र आतां

मानवी शक्तीच्या सर्वस्वी—निदान शेंकडा नव्याण्णव हिस्से—आधीन झालें आहे. तें कसें तें दुसऱ्या भागांत पाहूं.

सध्यां इतकाच विचार करूं कीं उपलब्ध असलेल्या ज्ञानाचा संततिनियमनाकडे उपयोग करणें इष्ट आहे कीं अनिष्ट आहे ? या प्रश्नाचा विचार व्यक्तिदृष्टया, विशिष्टजनसमूहदृष्टया व मानवजातिदृष्टया असा तीन प्रकारांनीं करणें सोईचें दिसतें. यांपैकीं शेवटचा प्रकार प्रथम घेऊं.



## ३

## ' वसुधैव कुटुंबकम्. '

मनुष्याला जीवंत राहण्याला ज्या ज्या गोष्टींची आवश्यकता आहे त्या सर्वांची यादी करूं लागल्यास अग्रस्थानीं अनुक्रमें हवा, पाणी व अन्न हीं घालावीं लागतील. यांपैकीं हवेची किंवा पाण्याची तूट पडण्याचे प्रसंग फारच क्वचित् येतात, व तसे प्रसंग आलेच तर मनुष्याचें जीवित इतक्या लवकर संपतें कीं त्यासंबंधानें विचार करण्यास फारसा अवसर सांपडत नाहीं. अन्नाची गोष्ट थोडी निराळी आहे; म्हणजे मनुष्य अन्नाशिवाय बराच काळ कंठू शकतो. हल्लीं जगांतील जवळ जवळ प्रत्येक देशांत, ज्यांना कधींही पोटभर अन्न मिळत नाहीं असे लोक पुष्कळ आहेत, ही गोष्ट प्रत्येक मनुष्यास सहज दिसण्यासारखी आहे. ' प्रत्येक प्राण्याला ईश्वर जन्म देतो, तेव्हां अन्नाची काळजीही त्यालाच असली पाहिजे, व ज्यांना अन्न मिळत नाहीं त्यांनीं या किंवा मागील जन्मीं कांहींतरी पाप केलें असलें पाहिजे; एरवीं त्यांची उपासमार कशी होईल ? '

या बिनतोड कोटिक्रमानें ज्यांचें समाधान होत असेल त्यांची गोष्ट वेगळी. परंतु जे इतके भोळे नाहींत त्यांना ' या उपासमारीचें कारण काय असावें, व याला कांहीं उपाय आहे काय ?' असा विचार सुचल्याशिवाय राहणार नाहीं. अर्थातच उपाय शोधण्याचे अगोदर कारण शोधलें पाहिजे.

या कारणाचा पूर्ण विचार करून या विषयावर पहिला महत्त्वाचा ग्रंथ मालथस् नांवाच्या एका इंग्रजानें एकोणिसाव्या शतकाच्या प्रारंभीं लिहिला. त्यांतील सिद्धांत इतके सोपे आहेत कीं त्याच्या आधीं हे कोणाच्याच लक्षांत कसे आले नाहींत याचें आश्चर्य वाटतें. या ग्रंथांतील विचारसरणी थोडक्यांत सांगावयाची ह्मणजे अशी.

अशी कल्पना करूं कीं एका सुपीक व निरोगी प्रदेशामध्यें दहा वर्षांत लोकसंख्येची दुप्पट होते. अर्थातच हीच सुपीक व निरोगी परिस्थिति कायम राहील तर आणखी दहा वर्षांत लोकसंख्या पुनः दुप्पट म्हणजे मूळ संख्येच्या चौपट होईल, पुनः दहा वर्षांनीं आठपट, व आणखी दहा वर्षांनीं सोळापट होईल. म्हणजे चक्रवाढ व्याजाच्या उदाहरणांतील राशीप्रमाणें वाढ

होईल. आतां दहा वर्षांत दुप्पट होते ही नुसती कल्पनाच आहे असें नाहीं. फ्रेंच लोकांनीं कॅनडा प्रांतांत वसाहत केली त्यावेळीं त्यांची संख्या याहीपेक्षां जलद वाढली याबद्दल पुरावा आहे. परंतु प्रतिपक्षाचें कांहीं म्हणणें राहूं नये म्हणून मालथसनें ही दामदुप्पट दर पंचवीस वर्षांनीं होते असें मानिलें आहे. हा आंकडा दहा धरा किंवा पंचवीस धरा, किंवा याहीपेक्षां अधिक धरा, त्यांतील मुद्दयाची गोष्ट ही कीं अनुकूल परिस्थितीमध्यें लोकसंख्येचें मुद्दल चक्रवाढ दरानें वाढत जातें.

आतां ही अनुकूल परिस्थिति कायम टिकणें शक्य आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे. ती टिकण्यास, जसजशी लोकसंख्या वाढत जाईल त्याच प्रमाणांत अन्नाचा व हवेचा म्हणजे जागेचा पुरवठाही वाढला पाहिजे. म्हणजे जर पंचवीस वर्षांत लोकसंख्या दुप्पट झाली तर धान्य, शाक वगैरे दुप्पट पिकलीं पाहिजेत. आतां कांहीं लोक मांसाहार करतात हें जरी खरें तरी जे प्राणी त्यांच्या भक्ष्यस्थानीं पडतात ते स्वतः वनस्पतींवरच वाढत असल्यामुळें अखेर भिस्त वनस्पतींवरच ठेविली पाहिजे. आणि शेतकीची ज्यांना थोडी तरी माहिती असेल

त्यांना पंचवीस वर्षांत त्याच जमिनींतून दुप्पट पीक काढणें किती दुर्घट आहे हें सांगण्याचें कारण नाहीं. तरी पण जमिनीवर अधिक परिश्रम घेऊन व खर्च करून व अगदीं अलिकडचे शास्त्रीय शोध मदतीस घेऊन घटकाभर अशी कल्पना करूं कीं त्याच जमिनींतून पंचवीस वर्षांत दुप्पट पीक निघूं लागलें. हीच कल्पनेची शिकस्त झाली, परंतु लोकसंख्येचें मान आणखी पंचवीस वर्षांत चौपट वाढतें, त्याशीं तोंड देण्याकरितां आणखी पंचवीस वर्षांत त्याच जमिनींतून चौपट पीक निघूं लागेल अशी कल्पना करणारास कोणताही शेतकरी महामूर्ख ह्मणेल! चौपट तर काय परंतु तिप्पटही पीक पन्नास वर्षांत निघूं शकणार नाहीं. तात्पर्य काय कीं प्रतिवर्षी एकाच जमिनींतून निघणाऱ्या पिकाची चक्रवाढीनें तर राहोच, परंतु सरळ व्याजाप्रमाणेंही वाढ होत नाहीं. तरीही प्रतिपक्षाचें कांहीं म्हणणें राहूं नये म्हणून ही वाढ सरळ व्याजाप्रमाणें होते असें मालथसनें धरलें आहे.

या सर्वांचा गोषवारा असा:—अनुकूल परिस्थितीमध्यें लोकसंख्येची वाढ किमानपक्ष पंचवीस पंचवीस वर्षांचे कालावधींत

दुप्पट, चौपट, आठपट, सोळापट अशा प्रमाणांत होते, व शेतकी, बागाईत वगैरेच्या पिकाची वाढ त्याच कालावधींत दुप्पट, तिप्पट, चौपट अशी झाल्यास पराकाष्ठा. यावरून वरवर पाहणारास सुद्धां सहज दिसुन येईल कीं पिकाची वाढ लोकसंख्येच्या वाढीला कधींही पुरी पडूं शकणार नाहीं. अन्नाच्या मानानें लोकसंख्येची नेहमीं फाजील वाढ होण्याची प्रवृत्ति असते. मालथसच्या ग्रंथांतील मुख्य सिद्धांत हाच.

यावर कोणी अशी शंका काढील कीं अधिक पिकाची जरूर पडल्यास अधिक जमिनीची लागवड करतां येईल, व मग तितक्याच जमिनींतून दुप्पट पीक काढण्याचें कारण पडणार नाहीं. जोंपर्यंत सुपीक जमीन रिकामी पडली आहे तोंपर्यंतच ही शंका खरी आहे, परंतु सुपीक जमीन केव्हां तरी संपणारच व बहुतेक देशांमध्यें ती संपलेलीच आहे. नुसती रिकामी जमीन कामाची नाहीं, ती सुपीक असेल तरच उपयोग, नाहीं तर लागवड करण्यांत फायदा होणार नाहीं व फायद्याशिवाय कोणी लागवड करणार नाहीं. * आजच जगांतील सर्व सुपीक

---

* हा मुद्दा मालथसनें आपल्या पुस्तकांत दिलेला नाहीं, परंतु महत्त्वाचा आहे.

जमीन संपली नाहीं हें जरी खरें, तरी अशी जमीन फारच थोड्या ठिकाणीं शिल्लक आहे व तेथेंही नवीन वसाहती होत आहेत व या वसाहतींतील लोकसंख्या झपाट्यानें वाढत आहे हेंही खरें आहे. या बाबतींत इतकें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं नवीन जमिनीची लागवड ही मुष्किलीनें व सावकाशीनें होणारी गोष्ट आहे व लोकसंख्येची वाढ सहज व झपाट्यानें होत असते. अशाच प्रकारची आणखी एक शंका म्हणजे ' नवीन प्रकारचें खत, किंवा अन्न तयार करण्याची एखादी रासायनिक पद्धति निघाल्यास अन्नाचा पुरवठा एकदम वाढेल ! ' परंतु अशा खताचा किंवा अशा पद्धतीचा शोध लावणें कोणाच्या हातची गोष्ट नाहीं; व व अशा शोधामुळें कदाचित् थोडे दिवस अन्नाची विपुलता झाली तरी लोकसंख्येच्या प्रचंड वाढीपुढें ती फार दिवस टिकणार नाहीं व असे नवीन शोध जरूर पडेल तसतसे पुनःपुनः लागतील असें धरून चालणें मूर्खपणाचें होईल. ज्या ज्या वेळीं लढाई, प्लेग वगैरे कारणांनीं एकदम एखाद्या देशांत लोकसंख्या कमी होऊन अन्नाची तात्पुरती विपुलता होते तेव्हां तेव्हां लोकसंख्येची वाढ अधिक झपाट्यानें होऊन पूर्व स्थिति येण्यास अत्यंत थोडा कालावधि पुरतो, याबद्दल ऐतिहासिक पुरावा भरपूर आहे.

एका फ्रेंच लेखकानें १९०४ सालीं पृथ्वीवरील लोकसंख्या व अन्नाचा पुरवठा यांचा हिशेब असा काढला आहे कीं प्रत्येकास पोटभर अन्न द्यावयाचें म्हटल्यास हा पुरवठा दोन तृतीयांश लोकांस देखील पुरेसा नाहीं. यावरून हें उघड होतें कीं श्रीमंतांनीं अन्नाची नासाडी कितीही कमी केली, आगगाडया, आगबोटी वगैरेंनीं ने आण करण्याची कितीही उत्तम सोय केली, मजुरांना कितीही पगार दिले, कर कितीही कमी केले, दुष्काळाचीं कितीही कामें सुरू केलीं, तरी जगांतील कांहीं लोकांची उपासमार होणारच. यास तोड काय ?



## ४

## देशाभिमान.

प्रसिद्ध फ्रेंच लेखक ' ल दांतेक् ' यानें असें ह्यटलें आहे कीं समाजाची इमारत स्वार्थाच्या पायावर रचलेली आहे. प्रत्येक मनुष्याचें जीवित ह्मणजे सर्व जगाशीं एका व्यक्तीची लढाई. या लढाईमध्यें कधींकधीं संघशक्तीचा उपयोग करण्यांत सर्वांचेंच हित असतें हेंच समाजस्थापनेचें आदिकारण. अशा संघांच्या आपापसांतील कलहांमुळें स्वतःच्या संघाबद्दल अभिमान उत्पन्न होतो. देशाभिमानाची उत्पत्ति यांतच आहे, व जोंपर्यंत लढाया वगैरे रानटी प्रकार जगांत चालू आहेत, तोंपर्यंत देशाभिमानाचा अत्यंत उपयोग आहे व ' वसुधैव कुटुंबकम ' वगैरे तत्त्वें अमलांत आणणें शक्य नाहीं हें उघड आहे.

आतां एका देशासंबंधींच विचार करूं गेल्यास असें म्हणतां येईल कीं त्या देशांत जरी अन्न पुरेसें पिकलें नाहीं तरी इतर देशांतून तें आणतां येईल. परंतु त्यासही मर्यादा आहे हें उघड आहे, आणि ज्या देशांतून तें अन्न आणलें जाईल त्यांत अधिकच

तूट पडेल. सध्यां इंग्लंडसारखा संपन्न देश पाहिजे तितकी किंमत देऊन हिंदुस्थानासारख्या गरीब देशांतून अन्न विकत घेऊं शकतो, व याचा परिणाम इतकाच होतो कीं हिंदुस्थानांतील लोकांस अन्नाची अधिकच तूट पडते. इतकें करूनही इंग्लंडमध्यें सुद्धां सर्वांस पोटभर अन्न मिळत नाहींच. यावरून जगांतील अन्नाच्या पुरवठ्याचे मानानें लोकसंख्या किती फाजील वाढलेली आहे याची सहज कल्पना होईल.

इंग्लंडची लोकसंख्या वाढल्यामुळें तेथील लोकांस काम मिळत नाहींसें झालें आहे, व कांहीं लोकांनीं देशत्याग केल्याशिवाय ही स्थिति सुधारणें शक्य नाहीं असें विधान तेथील मुख्य प्रधानानें पार्लमेंटपुढें केलेलें आहे! जपानी लोकांची उपजीविका भातावर आहे, व जपानमध्यें हल्लींपेक्षां जास्त भात पिकणें शक्य नाहीं असें जपानी तज्ज्ञ डॉ. इनागाकी म्हणतात!

शिवाय कांहीं समाजशत्रु या फाजील वाढीस उत्तेजन देण्याचा प्रयत्न करीत असतात. अशा फाजील वाढीमुळें अशिक्षित जनसमूह वाढत जाऊन अज्ञाणी लोकांच्या अंध धर्मश्रद्धेवर

उपजीविका करणाऱ्या धूर्तांस चांगलेंच फावतें, व प्रजोत्पत्ति हो प्रत्येक धर्मांत अत्यंत पुण्यप्रद गोष्ट समजली जाते यांतील इंगित हेंच.

दुसऱ्या प्रकारचे समाजशत्रु म्हणजे मुत्सद्दी व सेनानायक. हिंदुस्थानसारख्या दुर्बल पराधीन देशांतील मुत्सद्द्यांस आपल्या हक्कांसंबंधानें बोलण्यापलीकडे फारसें काम नसतें. परंतु स्वतंत्र देशांत अशी स्थिति नसते. स्वतःचें संरक्षण करणें, व स्वतःपेक्षां दुर्बल राष्ट्रांवर हल्ला करण्याकरतां योग्य कुरापती काढणें हें तेथील मुत्सद्द्यांचें काम असतें. युद्ध न झाल्यास मुत्सद्दी व सेनानायक यांचें महत्त्व वाढत नाहीं, युद्ध सैन्याशिवाय होत नाहीं, व बुभुक्षित लोकांशिवाय सैन्याची भरती होत नाहीं. एतदर्थ हे समाजशत्रु लोकसंख्येची वाढ शक्य तितकी जलद झाली पाहिजे असें देशाभिमानाचा आव घालून प्रतिपादन करीत असतात. हा देशाभिमानाचा प्रकार युरोपीय राष्ट्रांत हल्लीं चालू आहे, व इतर सर्व राष्ट्रांस यापासून अत्यंत धोका आहे. इंग्लंडांत लोकसंख्या शक्य तितकी वाढवून तेथील लोकांनीं सर्व जगांतील वसाहतींची जागा व्यापून टाकली पाहिजे, नाहींतर

काळ्या किंवा पिंवळ्या लोकांनीं ती व्यापल्यास तें आपणांस नडेल, असें इंग्लंडांतील फाजील देशाभिमान्यांचें उघड म्हणणें आहे. जर्मनी व जपान यांच्या लोकसंख्येच्या अमर्याद वाढीची युरोपीय राष्ट्रांस भीति वाटते, परंतु तेथेंही संततिनियमन होत आहे. जर्मनींत जन्मांचें प्रमाण झपाट्यानें कमी झालें आहे, व जपानमध्यें होत आहे. त्यांत इतकीच समाधानाची गोष्ट आहे कीं यापुढें शस्त्रास्त्रसंबंधी कल्पक शक्तीवरच युद्धांत जय अवलंबून राहणार, व संख्येचें फारसें महत्त्व राहणार नाहीं अशीं स्पष्ट चिन्हें दिसत आहेत. या कल्पक शक्तीस थोडी बहुत तरी शिक्षणाची जरूर असते व लोकसंख्या मर्यादित नसल्यास शिक्षण अशक्य होईल, व मुत्सद्दीगिरीच्या स्वार्थी दृष्टीनेंहि लोकसंख्येस आळा घालणेंच इष्ट होईल.

समाजशत्रूंचा आणखी एक वर्ग म्हणजे मजुरांच्या जिवावर चैन करणारे कारखानदार. जसजशी लोकसंख्या जास्त वाढेल तसतसा अन्नाचा पुरवठा कमी पडून, मिळेल ती मजुरी घेऊन काम करणारे मजूर विपुल होतील, मजुरीचे दर कमी होतील व कारखानदारांस फायदा जास्त होईल, हें स्पष्टच आहे. मजुरांची

स्थिति सुधारण्यास मजुरांची संख्या कमी होणें हा एकच मार्ग आहे, व लोकसंख्या कोणत्याही कारणांनीं कमी होईल तरच हें शक्य आहे.

मजुरांची स्थिति सुधारणें, देशांतील भिकार कमी होणें, शिक्षणाचा फैलाव होणें इत्यादि गोष्टी जर इष्ट असतील तर लोकसंख्येची वाढ फाजील होणें देशभिमानाच्या दृष्टीनेंही इष्ट दिसत नाहीं.

लोकसंख्या फाजील झाली असें केव्हां समजावें ? हवेच्या दृष्टीनेंच पाहिलें तर एका चौरस मैलास अमुक एक लोकसंख्या असली तरी चालेल असें ठरवितां येईल. परंतु अन्नाच्या दृष्टीनें जमिनींत उत्पन्न किती होतें हें पहावें लागेल. म्हणजे, सर्व देशांस एकच नियम लागू पडणार नाहीं. परंतु अपुऱ्या अन्नाचा परिणाम सर्वत्र असा होतो कीं मनुष्याची जीवनशक्ति कमी होऊन तो रोगांस बळी पडण्याचा संभव वाढतो, व लोकांचें सरासरी आयुर्मान कमी होतें. अर्थात् हवा, पाणी वगैरेवरही आयुमान अवलंबून असल्यामुळें जेथें आयुर्मान कमी असेल तेथें त्याचें कारण

फाजील लोकसंख्या हेंच आहे असें खात्रीनें सांगतां येणार नाहीं. तेव्हां लोकसंख्या फाजील केव्हां म्हणावी ? या प्रश्नास इतकेंच उत्तर देतां येईल कीं जर एखाद्या देशाची लोकसंख्या कमी झाल्यानें लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारण्याचा संभव असेल, तर त्या देशाची लोकसंख्या फाजील समजावी. या व्याख्येंत अमेरिका किंवा इतर नवीन वसाहती सोडून इतर सर्व देशांचा समावेश होतो, व या देशांची लोकसंख्या कमी होणें हितावह आहे.

ब्रॅडलॉ व मिसेस् बेझंट यांवर १८७६ सालीं संततिनियमनावर एक पुस्तक प्रसिद्ध केल्याबद्दल खटला झाला, तेव्हांपासुन सुधारलेल्या देशांत जन्मांचें प्रमाण कमी होत गेलें आहे, परंतु या संबंधाची माहिती देण्याची पूर्ण मुभा फक्त हॉलंडांतच होती. यामुळें यूरोपांतील इतर देशांपेक्षां दारिद्र्य, रोगराई व मृत्यूंचें प्रमाण हॉलंडांत कमी आहे. तेथील लोकांची उंची वाढली आहे. मजुरीचे दर खरोखर वाढले आहेत ( म्हणजे बाजारभावाचे मानानें वाढले आहेत ). एकंदर स्थिति सुधारली आहे.

जपानमधील दोन खेड्यांची तेथील एका गृहस्थांनीं अशी

हकीकत दिली आहे. येथें संततिनियमन पद्धतशीर सुरू आहे [ भ्रूणहत्या, बालहत्या वगैरे ]. ३६० कुटुंबांपैकीं ४ च कुटुंबांत ३ पेक्षां जास्त मुलें आहेत. वर्षागणिक मूल असें एकही कुटुंब नाहीं. याचा परिणाम, येथील लोक अत्यंत सुदृढ आहेत व शाळेतील मुलें इतर देशांचे मानानें अधिक तरतरीत आहेत.

ही स्थिति संततिनियमनामुळें आली आहे. त्याची पद्धत मात्र सुधारली पाहिजे.



## ५

## स्वार्थ.

लकुरें उद्दंड झालीं । तों ते लक्ष्मी निघोन गेली ॥
बापडीं भिकेस लागलीं । कांहीं खाया मिळेना ॥ १ ॥
दिवसें दिवस खर्च वाढला। यावा होता तो खुंटोन गेला॥
कन्या उपवरी झाल्या त्यांला । उजवावया द्रव्य नाहीं २
मा॰। रुण ज्यांचें घेतलें । त्यांचें परतोन नाहीं दिल्हें ॥
ऐसें आभाळ कोसळलें । उद्वेगाचें ॥ ३ ॥

—रामदास.

स्वार्थदृष्टि जरी बहुतेक प्रसंगीं गौण समजण्यांत येते, तथापि जीवनकलहामध्यें स्वार्थासाठीं प्रयत्न केल्याशिवाय गत्यंतर नसतें, व विचार करूं गेलें असतां समंजसपणानें स्वार्थ साधल्यास त्यांत समाजाचेंही नुकसान नसतें; इतकेंच नव्हे तर प्रत्येकानें आपल्या कुटुंबाच्या पोषणाची खटपट करणें हें सामाजिक दृष्टीनें प्रत्येकाचें कर्तव्यच आहे. कुटुंबपोषणाची शक्ति अंगीं आल्याशिवाय पुरुषानें विवाह करतां कामा नये हें तत्त्व अजून हिंदुस्थानांत जरी फारसें अमलांत येत नाहीं, तरी

ही परिस्थिति हळूहळू बदलत आहे व बदलणार. परंतु कुटुंब-पोषणाची शक्ति म्हणजे तरी काय? कुटुंब किती मोठें समजावयाचें? अर्थात् कुटुंबाचा आकार संततीवर अवलंबून राहणार. लग्न झाल्यापासून पांच सात वर्षांत पांच सहा मुलं झाल्याचीं कांहीं तरी उदाहरणें प्रत्येकाच्या पहाण्यांत असतील, व कारकून वगैरे मध्यम पगारदारांची कमाई या प्रमाणांत वाढण जवळजवळ अशक्यच असतें. अशा रीतीनें मुलें होत गेल्यास त्यांची जोपासना, शिक्षण वगैरे व्हावं तसें होणें शक्य नाहीं व अर्थातच इतकीं मुलें होऊन तीं सर्व जगल्याचीं उदाहरणें विरळा. अशा स्थितींत संततिनियमन शक्य झाल्यास किती फायदा होईल हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. ईश्वरावर हवाला टाकणारांचीही बाळूबाकूनें वर्णन केलेल्या गरीब स्त्री-प्रमाणें स्थिति होऊन 'हे परमेश्वरा, संतति जर तुझ्याच कृपेनें होत असेल तर हा कृपेचा ओघ आतां आवरून धर' असेंच म्हणण्याची वेळ येते.

आईबाप मुलांस जन्म देतात हा त्यांच्यावर मोठा उपकार आहे व एतदर्थ त्यांनीं आईबापाच्या आज्ञेंत राहिलें पाहिजे

वगैरे गोष्टी मुलांस नेहमीं सांगण्यांत येतात, परंतु हा जर उपकार असेल, तर तो ते केवळ नाइलाज म्हणून करतात. मुलें जन्म मागत नाहींत, व मुलें रोगट झाल्यास हा त्यांच्यावर अपकारच आहे, उपकार नव्हे. मुलांसंबंधीं आपलीही कांहीं कर्तव्यें असतात ही जाणीव किती आईबापांस असते ? मुलांचें योग्य संगोपन करणें-- अर्थात त्यांस निरोगी ठेवणें हें त्यांतच अंतर्भूत आहे--व स्वतःचें योग्य रीतीनें पोट भरण्याची शक्ति येईल इतकें तरी शिक्षण त्यांस देणें हें आईबापांचें कर्तव्य. आणि संतति मर्यादित नसल्यास हें कर्तव्य अशक्य होईल. ज्याची संतति संपत्तीचे मानानें मर्यादित नाहीं त्यांचे हाल त्यांसच माहीत. ज्यांची अज्ञानामुळें अशी स्थिति होते व ज्यांना थोडाबहुत अभिमान असल्यामुळें दुसऱ्याजवळ तोंड वेंगाडणें बरें वाटत नाहीं त्यांची या बाबतींत कींव येते. परंतु आपल्या मुलांच्या पोषणाचा भार दुसऱ्यावर लादण्याचा आपला हक्कच समजणारे कोकिलप्रकृति हरीचे लालही पुष्कळ असतात. यामुळें ज्यांना स्वतःचे पोट भरून थोडे तरी पैसे शिल्लक टाकणें शक्य असेल त्यांना दुसऱ्याचीं मुलें पोसण्याचा प्रसंग हटकून येतो. ही स्थिति समाधानकारक नाहीं हें कोणीही समंजस मनुष्य कबूल करील.

गेल्या युद्धांतील अतोनात प्राणहानीमुळें कमी झालेली लोकसंख्या शक्य तितक्या लवकर वाढवून पुढील लढाईत मरण्यास माणसें तयार केलीं पाहिजेत अशा बुद्धीनें धूर्त मुत्सद्द्यांनीं बऱ्या लोकांकडून 'शिशुसप्ताह' सुरू करवले. अर्थातच त्यांच्या तालावर नाचणारे पुष्कळ अविचारी किंवा आपमतलबी लोक त्याना सामील झाले, व आतां दरवर्षी शिशुसप्ताहाचा बराच आरडाओरडा सुरू असतो. कुटुंबात असतील तितकीं माणसें व होतील तितकीं मुलें घेऊन ज्यांना मुंबईतील गलिच्छ वस्तीमध्यें एक किंवा दोन खोल्यांत रहावें लागतें, त्यांना हे शिशुसप्ताहवाले स्वच्छ हवेचें महत्त्व समजाऊन सांगणार व शिशुसंगोपन शिकवणार! ही त्यांची चेष्टा नव्हे काय? बरें कोरडा उपदेश न करतां त्यांस द्रव्याची मदत केली, तरी ती किती व किती दिवस करणार? समजा, अशा रीतीनें कांहीं मुलें जास्त जगलीं, तर त्यांची पुढें व्यवस्था काय? त्यामुळें लोकसंख्येची जास्त वाढ होऊन आधींच होत असलेली उपासमार अधिक वाढणार. ही मुलें थोडे दिवस कशींबशीं जगून नंतर भुकेनें मरण्यापेक्षां अल्पवयांतच मेलेलीं काय वाईट? खरा परोपकार ह्मणजे गरीबांस संततिनियमनाचे माग

शिकवण किंवा त्याचीं साधनें त्यांस पुरविणें. मग शिशुसप्ताहाची जरूर वाटल्यास तो करतां येईल. हल्लींच्या स्थितींत शिशुसप्ताह म्हणजे देशांत भिकार वाढवण्याचा मार्ग आहे.

अलीकडे शिशुसप्ताहवाले देखील संततिनियमनाचें महत्त्व कबूल करूं लागले आहेत. ( तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना पहा ).

ही सांपत्तिक स्थितीची गोष्ट झाली. ज्यांना सांपत्तिक अड-चण नाहीं, अशा कुटुंबांतही संततीचा अतिरेक झाल्यास स्त्रियांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम झाल्याशिवाय सामान्यतः रहात नाहीं, असा अनुभव आहे. पुष्कळ मुलें झाल्यानंतरही प्रकृतीनें सुदृढ राहिलेल्या कांहीं स्त्रिया आढळतात ही गोष्ट खरी, परंतु हा अपवाद होय. या विषयांतील तज्ज्ञ म्हणून नांवाज-लेले अमेरिकन डॉक्टर रॉबिन्सन् यांचें असें मत आहे कीं गर्भारपण व बाळंतपणाचा अनुक्रम निरंतर चालू राहिल्यास बहुतेक स्त्रिया कमकुवत व रोगी होऊन त्यांस अकालीं वार्द्धक्य व मरण येतें ही मूळच्या निरोगी स्त्रियांची गोष्ट झाली. रोगी स्त्रियांची गोष्ट यापेक्षांही वाईट. कित्येक रोग असे असतात कीं त्यांस गर्भावस्था व बाळंतपणाची मदत मिळाल्यास मृत्यु ठेव--

लेलाच; व कित्येक रोग मुलांत उतरण्याचा संभव असल्यामुळे एकतर अशीं मुलें लवकरच मरावयाचीं, किंवा न मेल्यास त्यांचे सबंध आयुष्य कंटाळवाणें होऊन समाजांत रोगी मनुष्यांची संख्या वाढावयाची. अशीं मुलें न झाल्यास काय वाईट ?

स्त्रियांच्या हक्कांबद्दल हल्लीं बरीच ओरड ऐकू येते ज्या स्त्रियांची गर्भधारणा कुत्र्यांमांजरांप्रमाणेंच यदृच्छेवर अवलंबून असते, त्यांना हक्क कसचे आणि स्वातंत्र्य कसचें ? केव्हां आणि किती वेळां गर्भधारणा व्हावी हें ठरविण्याचा स्त्रियांचा सर्वांत महत्त्वाचा हक्क आहे. परंतु हें त्यांना कळेल तेव्हां खरें !

एवंच, व्यक्तिदृष्ट्याही संततिनियमन अत्यंत इष्ट आहे.



## ६

## अज्ञानामुळें होणारे अनर्थ

संततिनियमनाचे कोणते उपाय आज उपलब्ध आहेत ते सांगण्यापूर्वी, याबद्दल जवळ जवळ सार्वत्रिक अज्ञानामुळें काय काय अनर्थ ओढवतात त्याचं थोडक्यांत दिग्दर्शन करूं.

१. जे आपलीं सामाजिक कर्तव्यें ओळखतात, ज्यांना लग्न करण्यामुळें उत्पन्न होणाऱ्या वाढत्या कुटुंबाच्या पोषणाच्या जबाबदारीची जाणीव असते–दुर्दैवानें हिंदुस्थानांत ही जाणीव फारच कमी प्रमाणांत दिसून येते परंतु–ज्यांना ती जाणीव असते त्यांना, निदान मध्यम किंवा गरीब स्थितींतील लोकांना तरी, लग्न अतिशय लांबणीवर टाकावें लागतें, किंबहुना अशक्य होतें. तें लांबणीवर टाकून तरी निभाव लागतोच असें नाहीं. कारण कल्पना करूं कीं अशा मनुष्यानें तिसाव्या वर्षी लग्न केलें व त्याच्या सुदैवानें त्याला बावीस वर्षांची बायको मिळाली. अशा कुटुंबास सुद्धां, स्त्रीच्या बाविसाव्या वर्षापासून पंचचाळिसाव्या वर्षापर्यंत दहा मुलें होणें मुळींच अशक्य नाहीं, व कदाचित वीसही होतील! तेव्हां दूरदर्शी मनुष्यास इतक्या मुलांची तरतूद

करणें शक्य नसेल तर लग्नच अशक्य होईल ! याचा परिणाम असा होतो कीं अशा उच्च प्रतीच्या मनुष्यांस संतति न झाल्यामुळें व अदूरदर्शी लोकांचा फैलाव झाल्यामुळें समाजाची स्थिति अधिकाधिक नीच होत जाते.

२. अशा रीतीनें अविवाहित राहिल्यास कामवासना सर्वस्वी आवरून ठेवतां येते कीं नाहीं हा दुसरा प्रश्न. ज्यांना आधुनिक शास्त्रज्ञानाचा, विशेषतः इंद्रियविज्ञानशास्त्राचा फारसा गंध नाहीं, असे लोक वारंवार असें प्रतिपादन करीत असतात कीं मनःसंयमानें पाहिजे त्या मनुष्यास पाहिजे तें करतां येतें, तशी इच्छा मात्र पाहिजे. अर्थातच या विधानास कोणत्याही प्रकारचा पुरावा ते देऊं शकत नाहींत. हें तत्त्वज्ञान दुसऱ्यास सांगण्यापुरतेंच असतें व अशा लोकांची स्वतःची वर्तणूक त्यास अनुसरून नसते. ही केवळ दुसऱ्यास नांवें ठेऊन स्वतःस मोठेपणा मिळविण्याची युक्ति असते. वस्तुस्थिति अशी आहे कीं सर्व लोकांची भूक जशी सारखी नसते, तशी सर्वांची कामवासनाही सारखी नसते व संयमनशक्तीही सारखी नसते. शिवाय त्या शक्तीचा उपयोग करण्याची इच्छा पाहिजे ! व तिचा उपयोग करणें नेहमींच

इष्ट असतें कीं नाहीं, हाही प्रश्नच आहे. या शास्त्रांतील आधुनिक तज्ज्ञांचें असें म्हणणें आहे कीं ज्यांची कामेच्छा मध्यम आहे त्यांनीं वीस बावीस वर्षांचे पुढें आत्मसंयमन केल्यास प्रकृतीवर अनेक अनिष्ट परिणाम होतात. ज्यांची कामेच्छा कमी असेल त्यांवर फारसे अनिष्ट परिणाम होणार नाहींत, व ज्यांची प्रबळ असेल त्यांवर जास्त होतील. असें संयमन केल्यामुळें पौरुष पूर्णपणें नष्ट झाल्याचीं उदाहरण आहेत ( ब्रह्म चर्यावर पुरवणी पहा. ) अर्थात् ' आत्मसंयमन ' याचा अर्थ ' कोणत्याही रीतीनें वीर्यपात होऊं न देणें ' असा धरला पाहिजे. स्त्रीसंगाचे अभावीं दुसऱ्या वाईट संवयी जडणें इष्ट नाहीं हें कोणीही कबूल करील, व आत्मसंयमन इष्ट असो व नसो, स्त्री-समागमाचे बाबतींत आत्मसंयमन करणारांस बहुतांशीं वाईट संवयी लागतात हें निर्विवाद आहे.

जे आत्मसंयमन करीत नाहींत किंवा करूं शकत नाहींत, ते एक तर वेश्यांस आश्रय देतात, किंवा रोगांचे भीतीनें अब्रूदार स्त्रियांस कुमार्गास लावण्याचा प्रयत्न करतात. अर्थात् अशा अब्रूदार मानलेल्या स्त्रियांपैकीं कांहीं आधींच कुमार्गांत असतात.

व त्यांचेपासूनही रोग वगैरे होतात ही गोष्ट वेगळी. हे परिणाम इष्ट आहेत असें कोणी म्हणणार नाही.

३. अशा रीतीनें परमा, गर्मी वगैरे रोग झाल्यास त्यांवर योग्य औषधोपचार होणें कठिण. लज्जेमुळें जाहिरातींतील औषधांवर भिस्त ठेऊन त्यांतच रखडणारे फार. अशा लोकांनीं लग्न केल्यास त्यांच्या बायकांस व मुलांबाळांसही हे रोग आपलेमे करतात. ( रोगी स्त्रियांपासूनही पुरुषांस रोग होऊं नये किंवा पुरुषांपासून स्त्रियांस होऊं नये अशीं साधनें हल्लीं उपलब्ध आहेत * परंतु अशा साधनांची माहिती देणें अनीतिकारक आहे असें कांहीं हेकेखोर पारंपरिक लोक अजून समजतात ! )

४. वर पुरुषांची जी गोष्ट सांगितली तीच थोड्याशा कमी प्रमाणांत स्त्रियांची. पुष्कळ स्त्रियांस स्वभावतःच कामवासना पुरुषांचे मानानें कमी असते, व सामाजिक बंधनांमुळें ती दिसूं न देण्याची त्यांना संवय असते. तथापि त्यामुळें सर्वच स्त्रिया आत्मसंयमन करूं शकतात असें नाहीं. कांहीं प्रबल कामवासने-

* याच लेखकाचें ‘ गुप्त रोगांपासून बचाव ’ हें पुस्तक पहा.

मुळें, कांहीं वेश्यांकडे जाण्यास भिणाऱ्या पुरुषांच्या खट-पटीमुळें व कांहीं परिणामांच्या अज्ञानामुळें आत्मसंयमन विसरतात व प्रतिबंधक उपायांच्या अज्ञानामुळें गरोदर होतात अशी स्त्री विवाहित असल्यास ठीक, परंतु कुमारिकांस किंवा विधवांस गर्भधारणेचा हक्क नसल्यामुळें भयंकर सामाजिक छळाची भीति त्यांचेपुढें उभी राहून त्या हरप्रयत्नांनीं गर्भपात करण्याचा प्रयत्न करतात, व तें न जमल्यास स्वतः जीव देतात. ही त्यांची चूक नाहीं, समाजाची चूक आहे. यापेक्षां अशा स्त्रियांनीं आधुनिक उपायांनीं गर्भधारणा बंद केल्यास त्यांची व त्यांच्या कुटुंबांची अब्रू तरी जाणार नाहीं. विवाहित स्त्रीच्या गर्भधारणेमध्यें व कुमारिकेच्या किंवा विधवेच्या गर्भधारणे मध्यें इंद्रियविज्ञानदृष्ट्या कोणताही फरक नाहीं, व सामाजिक दृष्टीनेंही असण्याचें कारण नाहीं असें आमचें स्पष्ट मत आहे. तरी पण समाजाला जोंपर्यंत तें कबूल नाहीं, तोंपर्यंत केवळ उपायांच्या अज्ञानामुळें अब्रूला धक्का लागणेंही इष्ट नाहीं व गर्भपात होणेंही इष्ट नाहीं.

५. अदूरदर्शी लोकांनीं लग्नें केल्यामुळें त्यांची स्थिति तर खालावतेच परंतु त्यांचीं मुलें पोसण्यास इतर लोकांची मदत

लागते व अशा रीतीनें सर्व समाज निकृष्ट दशेस पोंचतो. जेमतेम जगण्यास पुरेल इतकेंच खाऊन पुष्कळ लोकांस रहावें लागतें, व एखादे वर्षी पीक कमी आल्यास हे सर्व लोक एकदम मरतात. दुष्काळांतील प्राणहानीचें हें एक मुख्य कारण आहे. दुष्काळाचीं कामें सुरू केल्यानें अन्नाचा पुरवठा वाढत नाहीं.

व्हिएना शहरांतील शाळेंत जाणाऱ्या १,८४,००० मुलांमुलींस तपासतां असें आढळलें कीं त्यांपैकीं १,७८००० स बरोबर अन्न मिळत नाहीं, व शेंकडा ७५ क्षयी दिसतात! बरींच मुलें केवळ थंडीनें मरतात. व कित्येक वेळां उपजलेल्या मलास कपड्याच्या अभावीं कागदांत गुंडाळण्याचा प्रसंग येतो!

६. अतिशय थोड्या अंतरानें व अतोनात मुलें होत गेल्यास अर्थातच मुलांचें संगोपन योग्य रीतीनें होत नाहीं व त्यांतील बरींच लहानपणींच मृत्युमुखीं पडतात. जगांतील सर्व देशांत ( रशियांतील कांहीं भाग खेरीज करून ) लोकसंख्येचे मानानें जन्मांचें व मृत्यूंचेंही मान हिंदुस्थानांतच जास्त आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दुष्काळ, प्लेग वगैरेचेंही हिंदुस्थान

माहेरघर झालें आहे, व या दोन गोष्टींतील संबंध लक्षांत ठेवण्याजोगा आहे. ( पुरवणी ३ पहा )

७. अमर्याद संतति झाल्यानें पुष्कळ सुदृढ स्त्रिया सुद्धां रोगी होऊन अकालीं मरण पावतात हें वर सांगितलेंच आहे. परंतु एखाद्या स्त्रीस क्षयरोग किंवा हृदयाचा विकार असल्यास तिला गर्भधारणा म्हणजे मृत्यूच आहे. क्षयी स्त्री कदाचित् प्रसूतीपर्यंत बरी झाल्यासारखी दिसेल, परतु नंतर रोग एकदम उलटतो व थोड्याच दिवसांत निकाल करतो.

८. मज्जातंतूच्या पुष्कळ रोगांचें कारण स्त्रीपुरुषांचे संबंधाविषयीं निर्बंध व त्यामुळें जबरीचें आत्मसंयमन हें होय असें आतां निर्विवाद सिद्ध झालें आहे. शिवाय त्यामुळें पुरुषाचें पौरुष व स्त्रीचें स्त्रीत्व अजीबात नष्ट होण्याचा संभव असतो तो वेगळा.

९. मजुरांची संख्या वाढल्यामुळें व सर्वांस काम पुरविणें शक्य नसल्यामुळें मजुरीचे दर अत्यंत कमी होऊन मजुरांची दुर्दशा होते.

१०. संततिनियमनासंबंधीं ज्ञान थोडेंबहुत तरी उच्च वर्गी-

तील लोकांतच असल्यानें ते संतति नियमित करतात व खालच्या प्रतीच्या लोकांस माहिती नसल्यामुळें त्यांची संख्या मात्र अमर्याद वाढते. हें ज्ञान सर्वांस देणें हाच यास उपाय आहे. म्हणजे नीच प्रतीची संख्या जास्त होणार नाहीं.

११. पुष्कळ मानसिक व शारीरिक रोग व व्यंगें पुढील पिढींत उतरणारीं असतात. उदाहरणार्थ, वेड, गर्मी, अपस्मार, वगैरे. अशा रोग्यांस संतति होणें इष्ट नाहीं. इतकेंच नव्हे तर निरोगी मनुष्यही समागमाचे वेळीं दारूच्या धुंदींत असल्यास भावी अपत्यावर अनिष्ट परिणाम होतो. कोणी अशी शंका घेईल कीं असे लोक नियमनाचे उपाय न वापरतील तर ? याचें उत्तर दुसऱ्या भागांत दिलें आहे. ( पान ६३—६४ पहा )

१२. अमर्याद लोकसंख्या वाढल्यामुळेंच एका राष्ट्रास इतर राष्ट्रांवर हल्ला करण्याचा प्रसंग येतो. वरवर कितीही दुसरी कारणें दिसलीं तरी शोध केल्यास मुळाशीं हेंच कारण बहुतकरून सांपडतें. गेल्या लढाईंत जर्मनीची अमर्याद लोकसंख्या हेंच मुख्य कारण होतें.

१३. कोंबडी झांकून ठेविली तरी सूर्य लपत नाहीं, तसेंच

हेकेखोर लोकांच्या खटपटीनें ज्ञानही लपत नाहीं. फायदेशीर गोष्टी मिळविण्याची खटपट प्रत्येक मनुष्य करणारच, व संतति-नियमनांत फायदा आहे असें एकदां मनुष्यास कळलें कीं तो बऱ्या वाईट उपायांनीं तें करणार. बिनधोक उपायांचे ज्ञान नसल्यास तो अपायकारक मार्गांत शिरणार. फ्रान्स व अमेरिका येथें अशी स्थिति झाली आहे. तेथें असे उपाय सांगणें गुन्हा असल्यामुळें तेथील बरेच लोक अपायकारक रीतींनीं आपला उद्देश साधतात. बिनधोक शास्त्रीय उपायांचें ज्ञान सर्वांस देणें हाच उत्तम मार्ग आहे.



७

# लोकसंख्येस नैसर्गिक मर्यादा

अमुक एक अन्नाच्या संग्रहानें फार झालें तर अमुक इतक्या मनुष्यांचें पोषण होईल, जास्त मनुष्यांचें होणार नाहीं, हें जर खरें, तर लोकसंख्या त्यापेक्षां जास्त वाढल्यास काय होईल ? अर्थातच लोकसंख्या कोणत्या तरी रीतीनें मूलपदावर येईल. ह्मणजे जितकीं मनुष्यें जास्त झालीं असतील तितकीं कमी झालीं पाहिजेत, कारण सर्वांस पुरेसें अन्न नाहीं. मग तीं मृत्यूनें कमी होवोत किंवा दुसरीकडे निघून जावोत. अन्नसंग्रहानें ठरलेल्या मर्यादेंतच लोकसंख्या असली पाहिजे व ती वस्तुतः अनेक मार्गांनीं मर्यादित होत असते. या मार्गांमध्यें दोन प्रकार आहेत.

१. पहिला प्रकार म्हणजे लोकसंख्येचा नाश होण्याचे मार्ग, म्हणजे दुष्काळ, रोगराई, लढाया, खून, बालहत्या, रोगजनक धंदे वगैरे. या मार्गांचा विचार केला म्हणजे हे सर्वच अनिष्ट आहेत असें म्हणावें लागतें.

अलीकडे शास्त्रीय प्रगतीमुळे रोगराई कमी झाली, व रोगी मनुष्येंही पुष्कळ दिवस जगूं लागलीं. तेव्हां लोकसंख्या कमी होण्यास लढाया, दुष्काळ व धरणीकंप एवढींच बाकी राहिलीं. कांहीं लोक लढाई बंद करण्याची खटपट करतात! परंतु दुष्काळांत भुकेनें मरण्यापेक्षां लढाईत मरण शतपट बरें हें कोणीही कबूल करील. एकंदर लोकसंख्या अन्नावर अवलंबून आहे, तेव्हां मरणाचा कोणता मार्ग बरा एवढाच प्रश्न आहे. बाकी जितके जन्म तितकेच मृत्यु अजमासें असले पाहिजेत हें उघड आहे. अन्नाशिवाय जगण्याची युक्ति अजून सांपडलेली नाहीं!

२. दुसरा प्रकार म्हणजे लोकसंख्येच्या वाढीस प्रतिबंध होण्याचे मार्ग, म्हणजे दूरदर्शित्वामुळें लग्न उशीरां करणें किंवा मुळींच न करणें, विवाहित किंवा अविवाहित लोकांचें ब्रह्मचर्य, गर्भधारणेस नैसर्गिक किंवा कृत्रिम प्रतिबंध, भ्रूणहत्या वगैरे.

प्राचीन तत्त्ववेत्त्यांनीं या बाबतींत अनेक उपाय सुचविले होते; लोकसंख्येच्या अनिवार वाढीमुळें होणारे तोटे लक्षांत

आणून दगडापेक्षां वीट मऊ या न्यायानें मुलें उपजल्यावरोबर मारून टाकण्यास कायदेशीर परवानगी सॉलोमननें दिली होती. प्लेटोनें अशक्त मुलें मारावीं असें सुचविलें होतें. ॲरिस्टॉटल्चे मतें पुरुषांनीं ३७ व स्त्रियांनीं १८ वर्षेपर्यंत लग्न करतां कामा नये, व अमुक संख्येपेक्षां जास्त मुलें कोणासही होतां कामा नये असा कायदा करावा, व याकरतां जरूर पडल्यास भ्रूणहत्येची परवानगी द्यावी. हे उपाय आपणांस कितीहि अमानुष वाटोत. परंतु ते सुचविण्याचा हेतु समाजाच्या कल्याणाचा होता हें लक्षांत घेतलें पाहिजे. हल्लीं अशा उपायांची जरूरी नाहीं हें पुढील भागांत स्पष्ट होईल.



## ८

## मालथसनें सुचविलेला उपाय

मालथस् धार्मिक होता इतकेंच नव्हे तर धर्मोपदेशक होता. जोंपर्यंत त्यानें शास्त्रीय पद्धतीनें या विषयाचा विचार केला तोंपर्यंतचा त्याचा विचार फलप्रद झाला व त्यानें शोधून काढलेला लोकसंख्या व अन्नसंग्रह यांमधील संबंध सर्वमान्य आहे. यापुढें मात्र धार्मिक पडदा डोळ्यांवर बांधल्यामुळें मालथस् साहेब सपशेल घसरले ! प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें धर्म हा एक नाहीं, देशकालमानानें बदलणारा आहे व नैसर्गिक नियम देशकालमानावर अवलंबून नसतात. तेव्हां या दोहोंचा मेळ कसा बसणार ?

मालथस्ची दृष्टि अशी:—नैसर्गिक नियम ईश्वरानें केले. त्यांतील एका नियमाचे योगानें असंख्य प्राणी जन्मास येतात, व दुसऱ्या नियमाचे योगानें त्यांना अन्नाची टंचाई पडते, यामुळें ईश्वराकडे क्रूरतेचा दोष येतो. परंतु ईश्वर तर दयाळु असला पाहिजे ! हा ईश्वरावरील दोष टळावा कसा ? हा दोषही टळावा व लोकसंख्येच्या वाढीसही प्रतिबंध व्हावा, अशी

दुसरी युक्ति त्यानें शोधून काढली. त्यानें असें प्रतिपादन केलं कीं, मनुष्यानें कामेच्छा आवरून घेऊन आत्मसंयमन केलें कीं लोकसंख्येची वाढ पाहिजे तितकी कमी करतां येईल, व ही आत्मसंयमनाची उच्चतम संधि मनुष्यास मिळावी म्हणूनच ईश्वरानें हे दोन परस्परविरोधी नैसर्गिक नियम केले आहेत !

मालथसच्या मतें मुलें पोसण्याची शक्ति आल्याशिवाय लग्न करूं नये, लग्नापर्यंत पूर्ण* आत्मसंयमन करावें, व लग्नानंतरही जरूर तितकें आत्मसंयमन करावें ! मालथसच्या दृष्टीनें लग्नानंतरही जरूर तितकें आत्मसंयमन करतां येतें, तर लग्न तरी उशीरां करण्याची जरूरी कोठें राहिली ? संयमन केलें म्हणजे झालें ! ज्याला मनुष्यस्वभावाची थोडी बहुत तरी कल्पना आहे त्याला ही आत्मसंयमनाची युक्ति ऐकून हंसूंच येईल. समजा मनुष्यानें तिसाव्या वर्षी लग्न केलें व पसतिसाव्या वर्षापर्यंत त्याला दोन मुलें झालीं व जास्त मुलें पोसण्याचें सामर्थ्य नाहीं, तर त्यानें पुढें जन्मभर आत्मसंयमन करावें ! खाशी युक्ति ! याबद्दल मालथसची किंवा त्याच्या ईश्वराची पाठ थोपटावी तें समजत नाहीं.

---

* पुरवणी १ पहा.

हा माल्थस्नें सुचविलेला उपाय लाख माणसांत एकाद्याला शक्य असलाच, तरी सुद्धां त्याला तो पसंत पडेल किंवा नाहीं याची वानवाच आहे ! शाब्दिक पसंती दर्शविणारे लोक पुष्कळ भेटतील, परंतु त्यांची कृति तदनुरूप होणार नाहीं. यामुळेंच माल्थस् लोकांना अत्यंत अप्रिय होऊन बसला.* गर्भधारणेस कृत्रिम प्रतिबंधाचे उपाय माल्थस्नें सुचविले असा पुष्कळांचा गैरसमज असतो. परंतु माल्थस्नें वर दिलेल्या उपायापेक्षां निराळा उपाय सुचविला नाहीं.

हा लोकसंख्येचा प्रश्न गर्भधारणेस कृत्रिम प्रतिबंध करतां आला तरच सुटेल असें कॉंडॉर्से नामक फ्रेंच तत्त्वज्ञानें माल्थस्च्या अगोदरच सुचविलें होतें. परंतु माल्थस्नें त्यावर विरुद्ध टीका केली आहे.

मनुष्यामध्यें ज्या नैसर्गिक प्रवृत्ति असतात, त्यांत दोन विशेष महत्त्वाच्या आहेत. एक क्षुधा आणि दुसरी कामवासना. पहिलीच्या योगानें व्यक्तीचें रक्षण होतें, दुसरीमुळें मनुष्यजातीचें रक्षण होतें. निसर्गामध्यें व्यक्तीपेक्षां जातीचें महत्त्व जास्त

* हा उपाय अशक्य असें माल्थस्नेंही जवळ जवळ कबूल केलें आहे.

असतें; जातीचें चिरस्थायित्व व्यक्तीवर अवलंबून असतें हेंच काय तें व्यक्तीचें महत्त्व. असे कित्येक जंतु आहेत कीं ज्यांमधील नर समागमानंतर लगेच प्राण सोडतात! आतां हें खरें कीं मनुष्यास कांहीं कालपर्यंत मुळींच अन्न न मिळाल्यास त्याला कामवासनेची आठवण सुद्धां होणार नाहीं, परंतु सामान्यतः पोटभर अन्न मिळून कामवासना अजीबात दडपून टाकण्यापेक्षां अन्न थोडें कमी खाऊन सुद्धां कामतृप्ति करण्याचा मार्ग लोक पसंत करतात, इतकी ही दुसरी प्रवृत्ति प्रबल असते. अशा स्थितींत मालथसूचा उपाय लोकांस कसा रुचावा?

आत्मसंयमनच करणें असेल तर खाण्यांतही करतां येईल. मुख्य अडचण काय ती अन्नाच्या पुरवठयाची आहे, तेव्हां आहार कमी केला म्हणजे झालें. शिवाय आत्मसंयमन हाच जर ईश्वराचा यांत उद्देश असेल, तर तो आहाराच्या बाबतींतच जास्त सिद्धीस जाईल. कारण नपुंसकांसही या बाबतींत आत्म-संयमनाचें पुण्य संपादन करण्याची संधि मिळेल!



# ९

# शास्त्रीय विवेचन

वरील चर्चेवरून इतकें स्पष्ट होतें कीं संततिनियमनाकरतां जो उपाय योजावयाचा तो कामवासनेच्या आड येतां कामा नये, व त्यानें गर्भधारणेस प्रतिबंध झाला पाहिजे. असा उपाय असेल तरच दुष्काळ, रोगराई वगैरे नैसर्गिक संकटांतून मनुष्य-जातीची मुक्तता होईल. असे उपाय कोणते तें पुढील भागांत सांगितलें आहे. ते समजण्याकरितां थोड्याशा शास्त्रीय विवेचनाची आवश्यकता आहे.

प्रथम एक सामान्य गैरसमज दूर करणं जरूर आहे. संभोग-कालीं स्त्रीस होणाऱ्या शारीरिक संतोषाचा व गर्भधारणेचा कार्य-कारणसंबंध बिलकूल नसतो, म्हणजे हा आल्हाद न होतांही गर्भधारणा होऊं शकते, व कामतृप्ति होऊनही पुष्कळ वेळां गर्भधारणा होत नाहीं. बलात्काराच्या खटल्यामध्यें, गर्भ-धारणा झाली आहे त्याअर्थीं स्त्रीची संमति असलीच पाहिजे, असा कोटिक्रम आरोपीतर्फेचे वकील कधीं कधीं

लढवीत असतात, परंतु ती नुसती वकिली, त्यांत सत्याचा अंश नाहीं. हें लक्षांत आणलें म्हणजे इतकाच प्रश्न राहिला कीं गर्भधारणे·




आकृति १:-१ मूत्रद्वार. ३ योनिमार्गावरील पडदा. ६, ७ योनिलिंग. ८ लघुभगोष्ठ, १० योनिमार्गाचें तोंड.




**आकृति** :. १,२ मलाशय. ३, ८, १०, ११ गर्भाशय. ४ गर्भाशय व मलाशयाचे मधील जागा. ५ योनिमार्ग ६ योनिमार्ग व मलाशयाचे मधील पडदा. ७ मलद्वार. ९ गर्भाशय व मूत्राशयाचे मधील जागा. १२ मूत्राशय. १३ हाड. १४ योनिमार्ग व मूत्राशयाचेमधील पडदा. १५ मुत्रमार्ग. १६ मूत्रद्वार. १७ महाभगोष्ठ.

शिवाय कामतृप्ति आपोआप जशी कधीं कधीं होते, तशीच कृत्रिम उपायांनीं ती करतां येईल कीं नाहीं ?

याकरतां गर्भधारणा म्हणजे काय हें पाहिलें पाहिजे. कोणत्याही प्राण्याचें किंवा वनस्पतीचें शरीर म्हणजे असंख्य सूक्ष्मपिंडांचा समूह असतो. या सूक्ष्मपिंडांस स्वतंत्र जीव असतो, म्हणजे त्यांच्या वृद्धि व पुनरुत्पादन या क्रिया स्वतंत्रपणें चाललेल्या असतात. हे सूक्ष्मपिंड सर्व एकसारखे नसतात व प्राण्याच्या किंवा वनस्पतीच्या जीवनाच्या दृष्टीनें निरनिराळ्या सूक्ष्मपिंडांकडे निरनिराळीं कामें वांटून दिलेलीं असतात. उदाहरणार्थ रक्तामधील पांढरे गोलक, रोगजंतु शरीरांत शिरल्यास त्यांवर हल्ला करून त्यांस खाऊन टाकतात व पचवितात किंवा निदान तसें करण्याचा प्रयत्न करतात. त्याचप्रमाणें कांहीं सूक्ष्मपिंड पुनरुत्पादनाकरतां वेगळे काढलेले असतात स्त्रीच्या शरीरांत हे विशेष प्रकारचे पिंड अंडाशयामध्यें असतात व पुरुषाच्या शरीरांत ते अंडामधें असतात. स्त्रीच्या शरीरांतील हे पिंड गोलाकृति असून त्यांस रजोगोल म्हणतात ( आकृति ५ ). पुरुषाच्या शरीरांतील लांबट असून




**आकृति ३.** पुरुषाचे शरीराची रचना. १ मलाशय. २ मूत्राशय ३ जघनास्थि. ४ मूत्रमार्ग. ५ जननेंद्रिय. ६ त्याचें अग्र. ७ अंड. ८ त्याचें वेष्टण. ९ शुक्रवाहक नलिका. १० गुदद्वार. ११ शुक्रोत्सेचक नलिका १२ रेताशय.




**आकृति ४**:-पुरुषाचें जननेंद्रिय: १ मूत्रनलिका. २ रेताशय. ३ शुक्रोत्सेचक नलिका.४,१४,१६, मूत्रमार्ग. ५ रेतवाहक नलिका.७,११ जननेंद्रियाचा खालचा भाग. ८, १० रेतवाहक नलिकेचा आरंभ. ९ अंड. १२ मुत्राशय, १३, ६ शुक्राबरोबर उत्सेक करणारे पिंड. १५, १७ शिस्नाची वरची बाजू.



आकृति ५. शुक्रजंतु व रजोगोल यांचें मीलन.



त्यांस डोकें व शेपूट असतें. त्यास शुक्रजंतु म्हणतात ( आकृति ६ ). या दोन्ही सूक्ष्मपिंडांत हा विशेष आहे की हे पिंड प्रजोत्पादनाकरता एकदेशस येतांना त्यांतील कांहीं महत्त्वाचा भाग गळून जाऊन हे अपूर्ण होतात, व त्यांना

**आकृति ६. शुक्रजंतु.**

बाहेर घालविण्याची शरीराची खटपट असते, व यामुळेंच कामवासना उत्पन्न होते. ऋतुप्राप्तीपासून विटाळ बंद होईपर्यंत स्त्रीच्या अंडाशयामध्यें दर महिन्यास विटाळाचे सुमारास एक ( क्वचित् दोन ) रजोगोल पक्व होऊन अंडवाहक नलिकांमधून ( आकृति ७ ) गर्भाशयांत येतात व सामान्यतः योनिमार्गांतून बाहेर पडून जातात. पुरुष वयांत आल्यापासून वार्धक्यापर्यंत अंडयुग्मामध्यें असंख्य शुक्रजंतु पक्व होतात. असे कोटयवधि शुक्रजंतु शरीरांतील आणखी कांहीं द्रवांशीं मिश्र होऊन प्रत्येक रेतोत्सर्गामध्यें जननेंद्रियांतून ( आकृति ७ ) बाहेर येतात. मैथुनाचे वेळीं हे कोटयवधि शुक्रजंतु स्त्रीच्या योनिमार्गांत पडतात व गर्भाशयांत आण्याकरतां त्यांच्यांत




**आकृति ७:** १, ५, २०, अंडवाहक नलिका. २ अपक्क रजोगोल. ३ अंडाशयाचें बंधन. ४, १९ रजोगोल ६ गर्भाशयांतील पोकळी. ७ त्याच्या टोंकाची पोकळी. ८ योनिद्वार. ९ पुरुषाचे जननेंद्रियावरील पिशवी ( पान ६१ पहा ). १०, ११ भगोष्ठ. १२ योनिमार्ग. १३ त्याची बाजू. १४ पुरुषाच्या इंद्रियांचे द्वार. १५ गर्भाशयाचें टोंक. १६ गर्भाशयबंधन. १७ अंडाशय.

शयत लागते. ( आकृति ५ ). गर्भाशयांत त्यावेळी रजोगोल असल्यास यांतील सर्वांत चपळ शुक्रजंतु त्या रजोगोलांत शिरून त्याशीं एकजीव होतो. एका शुक्रजंतूचा शिरकाव झाल्याबरोबर रजोगोलास एक कवच उत्पन्न होऊन इतर शुक्रजंतूंस आंत शिरणें अशक्य होतें, व बाकी सर्व जंतु लवकरच नाश पावतात. अशा रीतीनें हे दोन अपूर्ण पिंड–एक रजोगोल व एक शुक्रजंतु–संयुक्त होतील तरच त्यांना पूर्णत्व येऊन त्या पूर्ण पिंडाचा स्वतंत्र जीवनक्रम गर्भरूपानें सुरू होतो. स्त्रीची संभोगतृप्ति त्वचेच्या पुरेशा घर्षणावर अवलंबून असल्यामुळें ती रेतोत्सर्गाबरोबर होतेच असें नाहीं; पुष्कळ वेळां होत नाहीं. तरीही वर सांगितल्या–प्रमाणें त्यावेळीं रजोगोल गर्भाशयांत असल्यास गर्भधारणा होते. गर्भाशयांत रजोगोल नसल्यास शुक्रजंतु त्याच्या पलीकडे अंड–वाहक नलिकांत शिरतात, व रजोगोलाशीं संयोग एका नलि–केमध्यें होऊन तो गोल नंतर गर्भाशयांत उतरतो. यावरून हें स्पष्ट आहे कीं या दोन अपूर्ण पिंडांची भेट न झाल्यास उभयतांची संभोगतृप्ति होऊनही गर्भधारणा होणार नाहीं. या भेटीच्या आड नैसर्गिक कारणेंही पुष्कळ वेळां येतात. कधींकधीं पक्व झालेला रजोगोल आधींच

पडून गेलेला असतो, कधींकधीं धुपणीसारख्या बाधक स्रावामुळें शुक्रजंतूंची हालचाल योनिमार्गांतच बंद पडते, म्हणजे गर्भधारणा अर्थातच होत नाहीं.

वर सांगितलेंच आहे कीं विटाळाचे सुमारास रजोगोल पक्व होऊन कांहीं दिवसांनीं आपोआप पडून जातो. यावरून त्या सुमारास गर्भधारणेचा संभव असतो हें उघड आहे. शेकडा ९० वर गर्भधारणा विटाळाचे आधींचे दोन तीन दिवस व नंतरचे आठ दिवस इतक्या अवधींत होतात. यावरून कित्येक लोकांचा असा समज होतो कीं इतके दिवस संभोग वर्ज केला म्हणजे गर्भधारणा होणें शक्य नाहीं व अशा रीतीनें संततीस आळा घालण्याचा ते प्रयत्न करीत असतात. परंतु इतर दिवसांतही गर्भधारणा अशक्य नसते, संभव कमी इतकेंच. यामुळें हा प्रयत्न अनेक वेळां फसतो. * डॉ. सीजेल यांनीं गेल्या लढाई-मध्यें ३०० स्त्रियांची या संबंधांत चौकशी केली, यावरून ते म्हणतात कीं विटाळ सुरू झाल्या दिवसापासून ६ व्या दिवसा-

* यांचे एक कारण असें कीं शुक्रजंतूंची हालचाल स्त्रीच्या शरीरांत शिरल्यापासून सुमारें आठ दिवसपर्यंत कायम राहूं शकते.

पर्यंत गर्भधारणेचा संभव वाढत जातो. ६ पासून १२ व्या दिवसापर्यंत हा संभव सर्वात जास्त असतो व नंतर २१ व्या दिवसापर्यंत कमी होत जातो. २२ पासून २८ व्या दिवसापर्यंत या ३०० पैकीं एकही स्त्रीची गर्भधारणा झाली नाहीं.

या पद्धतीमध्यें आणखी एक दोष आहे तो असा. पुरुष आणि स्त्रिया यांमध्यें कामवासनेच्या बाबतींत एक मोठा फरक आहे, तो हा कीं स्त्रियांची कामवासना सर्वदा सारखी नसते. विटाळाचे सुमारास ती अधिक असते व नंतर कमी कमी होत जाऊन कित्येक दिवशीं मुळींच नसते, म्हटलें तरी चालेल; तेव्हां वरील प्रकारचें आचरण म्हणजे स्त्रियांच्या दृष्टीनें तरी कडक भूक लागली म्हणजे उपास व भूक नसेल तेव्हां मेजवानी असें होतें. नैसर्गिक लज्जेमुळें पुष्कळ स्त्रिया तें मुकाटयानें सहन करितात. परंतु त्याचा प्रकृतीवर अनिष्ट परिणाम होतो.

एकंदर हा उपाय सोयीचा नाहीं व यशस्वी होतोच असेंही नाहीं. कांहीं लोकांची अशीही समजूत असते कीं मूल अंगावर पाजणाऱ्या स्त्रीस गर्भधारणेची भीति नाहीं. परंतु डॉ. नारमन हेअर म्हणतात कीं ही समजूत शेंकडा १०० उदाहरणांत खोटी

ठरते. आतां खात्रीलायक उपाय कोणते तें सांगण्यापूर्वी संततिनियमनाविरुद्ध किंवा याबद्दलच्या ज्ञानाच्या प्रसाराविरुद्ध कित्येक लोक निरनिराळे आक्षेप आणीत असतात, त्यांचा थोडासा विचार करूं.



## १०

# आक्षेपांचा विचार.

१. **संततिनियमनाची सर्वांस माहिती झाल्यास सर्वच लोक या मार्गाचें अवलंबन करतील, व मृत्यूंपेक्षां जन्मांची संख्या कमी होऊन अखेर मनुष्यजाति नष्ट होईल.** ही भीति सर्वस्वी निराधार आहे. बहुतेक सुखवस्तु लोकांस संततीची इच्छा असते व गरीब लोकांसही त्यांच्या ऐपतीच्या मानानें संतति पाहिजे असते. नियमनाची पद्धति माहीत झाल्यावर कदाचित कांहीं दिवस लोकसंख्या कमीही होईल, परंतु तसें झाल्यानें देश अधिक सुखी होईल इतकेंच. यापुढें लोकसंख्या अन्नाच्या मानानें वाढेल, म्हणजे सर्वांस पोटभर अन्न मिळेल इतक्या बेतानें ती वाढेल. हें नुसतें अनुमान नाहीं. हॉलंड आणि न्यूझीलंड मध्यें अशा प्रकारची माहिती सर्वांस आहे, व तेथील लोकसंख्या कमी होत नाहीं. या देशांची सांपत्तिक स्थिति इतर सर्व देशांपेक्षां समाधानकारक आहे, म्हणजे त्यांचा व्यापार अवाढव्य आहे असें नाहीं, परंतु तेथें सर्वांस पोटभर अन्न व अंगभर वस्त्र मिळतें.

२. संततिनियमनामुळें अनीति वाढेल. या आक्षेपास उत्तर देण्यापूर्वी, नीति म्हणजे काय, हें ठरविलें पाहिजे. हें कशावरून ठरवावयाचें ? अर्थात आरंभींच सांगितल्याप्रमाणें हें बायबल, कुराण, किंवा भगवद्गीता वगैरे वरून ठरवितां येणार नाहीं. ज्याचा परिणाम व्यक्तींस व समाजास हितकर आहे तीच नीति व उलट पक्षीं ज्या पासून कोणाचें नुकसान होत नाहीं, ती अनीति नाहीं. हा आक्षेप आणणारांस ज्या अनीतीची भीति वाटते ती अशी. वयांत आलेल्या कुमारिका व विधवा या उपायांचा उपयोग करून स्वेच्छाचारी होतील व विवाहित स्त्रियांकरितां राखून ठेवलेल्या रतिक्रियेच्या पारंपरिक हक्काची पायमल्ली होईल, व पारंपरिक दृष्टीनें पाहतां ही अनीति आहे. शास्त्रीय दृष्टीनें पाहतां मंत्राक्षता किंवा विवाहाचे निरनिराळ्या देशांत प्रचलित असलेले दुसरे प्रकार यांनीं स्त्रीपुरुषांचे शरीरांत कोणत्याही प्रकारचा फरक होत नाहीं, व रतिक्रियेचे परिणाम त्यांच्या शारीरिक स्थितीवर अवलंबून असतात. तेव्हां शास्त्रीय दृष्टीनें ही अनीतीची व्याख्या कबूल करण्याचें बिलकूल कारण नाहीं. शिवाय यूरोपांत संततिनियमनाची माहिती सुशिक्षित लोकांस सामान्यतः असते, व अशिक्षित लोकांस नसते,

तरीही सुशिक्षित लोकांत पारंपरिक दृष्टीनेंही अनीतीचें प्रमाण जास्त आढळत नाहीं.

ज्या कुमारिका व विधवा हल्लीं नीतिमार्गानें चालतात, त्या केवळ गर्भधारणेच्या भीतीनेंच तशा राहतात काय? खास नाहीं. ज्या कांहीं स्त्रिया भीतीमुळेंच नितिमार्गात असतील त्यांची कवडीमोल नीति संभाळण्याकरतां सर्व समाजाचें नुकसान करावयाचें काय? ज्या कुमारिकांचे किंवा विधवांचे मनांत चलबिचल होते त्या भीतीनेंही आवरल्या जात नाहींत व गर्भधारणा झाल्यास त्यांना भ्रूणहत्या, बालहत्या किंवा आत्महत्या यांपैकीं एखादा मार्ग पत्करावा लागतो व त्यांच्या कुटुंबांतील सर्व माणसांस खालीं मान घालावी लागते. त्यापेक्षां संततिनियमनाचे उपाय वापरणें शतपट बरें. ज्या पारंपरिक नीतीच्या कल्पनांचे असे भयंकर परिणाम होतात त्या नीतीच्या कल्पनाच साफ बदलल्या पाहिजेत. याच पारंपरिक कल्पनांमुळें रतिक्रिया अशक्य झाल्यास पुरुषांस काय किंवा स्त्रियांस काय, अनेक घातुक संवयी लागतात. त्याविषयीं येथें अधिक विस्ताराचें कारण नाहीं, परंतु परिणामांवरून पहावयाचें

असेल तर नीतीच्या या पारंपरिक कल्पनांनाच शास्त्रीय दृष्टीनें अनीति म्हणावें लागतें.

३. हे उपाय अपायकारक आहेत. हें खोटें आहे. यासंबंधीं स्पष्टपणें बोलणेंही कठिण असल्यामुळें पुष्कळ लोकांना या उपायांबद्दल फारशी माहिती नसते, तरी पण संततिनियमनाचे फायदे लक्ष्यांत आल्यावर जो तो आपआपल्या अकलेप्रमाणें प्रयत्न करतो. अशा लोकांनीं योजलेल्या युक्त्यांपैकीं कांहीं अपायकारक असतात खऱ्या, परंतु संततिनियमनाचीं सगळींच साधनें अपायकारक असतात असें विधान खरें होणार नाहीं. बिनधोक उपाय दुसऱ्या भागांत दिले आहेत व धोका कशापासून आहे याचेंही दिग्दर्शन केलें आहे. हल्लींचे रसायनिक उपायांपासून अपाय तर नाहींच परंतु धुपणीसारखे रोगही त्यांनीं बरे होतात.

४. यांनीं वांझपणा येतो. हेंही खोटें आहे. हे उपाय वापरण्याचें बंद केलें असतां नेहमीप्रमाणें गर्भधारणा झाल्याचीं अनेक उदाहरणें आहेत. विवाहानंतर पहिलीं पांच वर्षें मूल

नको असें वाटल्यास पांच वर्षेपर्यंत हे उपाय वापरावे, व नंतर सोडून द्यावे. पुनः एक मूल झाल्यावर पांच वर्षांचे आंत दुसरें नको असल्यास पुनः तसेंच करावें. याप्रमाणें अनुक्रमानें होणाऱ्या मुलांमध्यें इच्छेनुरूप अंतर ठेवतां येतें.

१९२२ सालीं भरलेल्या संततिनियमनपरिषदेमधील डॉक्टरांच्या पोटसभेनें, ‘ संततिनियमनाचे शास्त्रीय मार्ग प्रकृतीस अपायकारक आहेत किंवा त्यांनीं वांझपणा येतो अशाबद्दल बिलकूल पुरावा नाहीं ’ असा ठराव ३ विरुद्ध १६१ मतांनीं पास केला.

**हे उपाय खात्रीचे नाहींत.** या आक्षेपांत थोडेंसें तथ्य आहे. एक गोळी घेतली म्हणजे संतती बंद झाली असा उपाय अजून निघाला नाहीं, यामुळें हे उपाय कसे वापरावे हें शिकावें लागतें. कोणताही एकच उपाय पाहिजे त्या स्त्रीस खात्रीनें लागू पडेल असें सांगतां येणार नाहीं, परंतु कोणत्याही स्त्रीस तपासून खात्रीचा उपाय सांगतां येईल शिवाय हिंवताप क्वोयनेलानें नेहमींच बरा होतो असें नाहीं, म्हणून हिंवतापावर तें देऊं नये म्हटलें तर कसें होईल ?

६. **संततिनियमनामुळें गर्भधारणेची मुळींच भीति राहणार नाहीं व संभोगास मर्यादा न राहिल्यामुळें प्रकृतीस इजा होईल.** ही भीति निराधार आहे. उलट संततिनियमन हें थोड्याशा खटपटीचें काम असल्यामुळें यानेंच अतिरेकास आळा बसेल. शिवाय एरवीं तरी, गर्भावस्थेमध्यें भीति कोठें असते? त्यावेळीं सर्वच दंपत्यें अतिरेक करितात कीं काय? गर्भधारणेच्या भीतीनें मर्यादित राहणारे पुरुष फारसे असतील असें वाटत नाहीं, व ज्यांनीं समागम अजीबात सोडून दिला नाहीं त्यांच्या मर्यादित राहण्यानें गर्भधारणेचा संभव कमी न होतां उलट जास्त होतो, वर्षांतून एकदां समागम करणाऱ्या दंपत्यास दरवर्षी एक मूल होणें अगदीं शक्य आहे.

७. **ही भ्रूणहत्या आहे.** ही समजूत अगदीं चुकीची आहे. वर सांगितल्याप्रमाणें दोन अपूर्ण सूक्ष्मपिंडांचा जेव्हां एक पूर्ण पिंड होईल तेव्हां तो गर्भरूपानें वाढूं लागतो. तेथपर्यंत त्यांत जीव येत नाहीं; त्याअर्थी या दोन अपूर्ण पिंडांच्या भेटीस अडथळा करणें म्हणजे हत्या कशी होईल? गर्भ (भ्रूण) च जेथें नाहीं तेथें भ्रूणहत्या शक्य नाहीं. प्रत्येक समागमाचे वेळीं, गर्भ राहिला काय किंवा न राहिला काय,

कोटयवधि शुक्रजंतूंचा नाश होतोच होतो. गर्भ राहिल्यास या असंख्य जंतूंपैकीं एकास पूर्णता येऊन तो वाढीस लागतो. संततिनियमनामध्यें या एकाचीही गति बाकीच्यांप्रमाणेंच होते, इतकाच काय तो फरक. यांत हत्या नाहीं. आतां भ्रूणहत्येचा विचार केल्यास धर्म आणि कायद्याच्या दृष्टीनें जरी तो गुन्हा समजला आहे तरी कांहीं प्रसंगीं गर्भनाश करण्यास हरकत असूं नये असें विचारी लोकांस आतां वाटूं लागलें आहे. गर्भिणी स्त्रीच्या जीवितास धोका असेल तर तसें करण्यास कायदाही डॉक्टरांस परवानगी देतो. फक्त अब्रूसाठीं गर्भपात करण्यास मात्र परवानगी नाहीं. परंतु ही परवानगी नसल्यामुळेंच कित्येक कुमारिकांवर व विधवांवर आत्मघात करण्याचा प्रसंग येतो. तेव्हां त्यांच्या दृष्टीनें तरी जीवितापेक्षां अब्रू अधिक महत्वाची आहे! कायद्याची दृष्टि तशी नाहीं हें त्यांचें दुर्दैव! शिवाय डॉक्टरानें गर्भपात केल्यास त्यांत बाळंतपणापेक्षां जास्त धोका नाहीं, परंतु कायद्याचे भीतीनें ते तसें करण्याचें नाकारतात, व त्यामुळें अनेक स्त्रिया भलतेच उपाय योजून प्राणास मुकतात. कायदा बदलल्यास या स्त्रिया मरणार नाहींत. अत्यंत नीच कोटींतील एखाद्या हरामखोरानें एखाद्या स्त्रीवर बलात्कार केल्यानें

जर तिला गर्भ राहिला तरी तिला गर्भपात करण्याची मोकळीक कायद्यानें नाहीं! एकंदरींत या कायद्याचे परिणाम पाहिले असतां हा नीतीला धरून नाहीं असें म्हणणें भाग पडतें. या संबंधी एफ्. डब्ल्यू. स्टेला ब्राऊन नांवाच्या बाईनीं असें लिहिलें आहे:— ' संततिनियमनाबरोबरच स्त्रीच्या मर्जीविरुद्ध कोणत्याही कारणानें गर्भधारणा झाल्यास गर्भपात करण्याचा हक्क स्त्रियांस असला पाहिजे. गेल्या युद्धांत शत्रूच्या बलात्कारानें गर्भिणी झालेल्या फ्रेंच स्त्रियांचा हा हक्क कबूल करण्याऐवजीं फ्रेंच सरकारनें त्यांचीं मुलें सांभाळण्याची जबाबदारी स्वीकारली व त्या स्त्रियांवर नांव गांव बदण्याचा प्रसंग आणला!... सात महिन्यांच्या गर्भाचा नाश करावा असें मी म्हणत नाहीं परंतु पहिल्या दोन महिन्यांत योग्य रीतीनें गर्भनाश केल्यास कोणताही अनिष्ट परिणाम नाहीं...मुलें व्हावी कीं नाहीं, किती व्हावीं, किती अंतरानें व्हावीं व कोणापासून व्हावीं हें ठरवण्याचा हक्क स्त्रियांचा आहे.' रशियांतील नवीन अमदानींत १९२० सालीं पास झालेल्या कायद्याप्रमाणें कोणत्याही गरोदर स्त्रीस गर्भनाश करणें असल्यास ती सरकारकडे अर्ज करते, व सांपत्तिक किंवा प्रकृती-संबधीं योग्य कारण दिसल्यास तिला डॉक्टरचा सल्ला व नंतर

जरूर तितकी विश्रांति व शुश्रूषा सरकारी खर्चानें मिळेल! गर्भपात करविणें असल्यास तो तीन महिन्यांचे आंतच करविला पाहिजे असा नवीन कायदा हल्लीं रशियांत पास झाला आहे.

**८. मुलांचा म्हाताऱ्या आईबापांस आधार असतो, तो संततिनियमनानें कमी होईल.** जितकीं मुलें जास्त तितका आधार जास्त, ही समजूत खोटी आहे. अमर्याद मुलें झाल्यानें त्यांचें शिक्षण, संगोपन चांगलें होत नाहीं. असें झाल्यास त्यांस स्वतःचेच पोट भरतां आलें तर नशीब! आईबापांस मदत लांब राहिली. परंतु अशी कल्पना करूं कीं अत्यंत गरीब दंपत्यास एकादाच मुलगा होऊन, लहानपणीं अत्यंत हाल सोसून पुढें तो आईबापांस मदत करूं शकला, तरी स्वतःच्या अपत्यानें इतके हाल सोसून सुद्धां म्हातारपणीं आपणांस मदत करावी अशी इच्छा करणारे आईबाप धन्य म्हणावयाचे! आम्ही यास अपत्यप्रेम म्हणत नाहीं.

**९. हे उपाय सृष्टिक्रमाच्या विरुद्ध आहेत.** असतील,. त्यांत काय बिघडलें? दांत घासणें, कपडे घालणें, हजामत करणें, अन्न शिजविणें, भाषा बोलणें, लिहिणें अशा नेहमींच्या व्यवहा-

रांतल्या शेकडा नव्याण्णव गोष्टी सृष्टिक्रमाच्या विरुद्धच आहेत, तरीही त्या आपण करतों इतकेंच नव्हे, तर मनुष्यप्राण्याचें सृष्टींतील वर्चस्व सर्वस्वी निसर्गविरुद्ध गोष्टींवरच अवलंबून आहे. सृष्टींतील इतर प्राणीच काय, परंतु विद्युच्छक्तीसारख्या प्रचंड शक्तीही याचमुळें मनुष्याच्या ताब्यांत आल्या आहेत. सृष्टीचे नियम आपणांस मोडतां तर येत नाहींतच, परंतु ते नियम शक्य तितक्या रीतींनीं शक्य तितक्या ठिकाणीं आपल्या कामीं लावणें आपलें कर्तव्य आहे; व आपणांस त्याची लाज न वाटतां अभिमान वाटला पाहिजे. वास्तविक पाहतां सृष्टिक्रमाच्या विरुद्ध जाणें शक्यच नसतें. इतर प्राण्यांप्रमाणें मनुष्यही सृष्टीचाच एक भाग आहे व तोही सृष्टिनियमांनींच जखडलेला आहे. मनुष्याची अक्कलही सृष्टीच्या बाहेर नाहीं, व त्या अकलेच्या जोरावर सृष्टिनियमांचा स्वतःच्या फायद्याकरतां उपयोग करणें सृष्टिक्रमाच्या बिलकूल विरुद्ध नाहीं. संततिनियमनासारख्या बिकट प्रश्नांत सुद्धां सृष्टिनियम आपल्या उपयोगी पडतात, ही आनंदाची गोष्ट आहे. सृष्टिनियमांनीं आपणांस ही सवड दिली नसती तर आपण काय केलें असतें ?

—:०:—

# भाग २ रा—आचार.



## १

## संततिप्रतिबंधाचे मार्ग.

या मार्गांपैकीं कांहीं पुरुषांनीं अमलांत आणण्याचे आहेत, व कांहीं स्त्रियांकरतां आहेत. प्रतिबंधाची काळजी कोणी घ्यावी याबद्दल थोडासा मतभेद आहे. गर्भधारणेचे परिणाम विशेषतः स्त्रियांसच जाचक असतात. तेव्हां त्यांनाच याची विशेष काळजी असणार, व हे उपाय प्रत्येक वेळीं काळजीपूर्वक अमलांत आणले तरच त्यांचा उपयोग आहे. पुरुष या बाबतींत साहजिकच निष्काळजी असतात, तेव्हां प्रतिबंधाचें काम स्त्रियांनींच आपणाकडे घेण्यांत त्यांचा फायदा आहे. तरी पण आम्ही दोन्ही प्रकार येथें देतों.

## पुरुषांनीं अमलांत आणावयाचे उपाय.

१. **अपूर्ण संभोगः**—म्हणजे रतिक्रिया शेवटास न नेतां, शुक्रोत्सर्ग होणार असें वाटल्याबरोबर इंद्रिय योनिमार्गांतून

बाहेर काढून घेणें. या मार्गाचा फायदा इतकाच कीं याला कोणत्याही प्रकारची तयारी करावी लागत नाहीं. व ज्यांना कांहीं कारणानें इतर साधनें मिळणें शक्य नाहीं त्यांच्या उपयोगी हा मार्ग आहे. परंतु यापासून अनेक तोटे आहेत. यापासून उभयतांचीही तृप्ति होत नाहीं व कालांतरानें त्याचा दोघांच्याही प्रकृतीवर वाईट परिणाम होतो. एकतर वेळ बरोबर साधल्यासच याचा उपयोग आहे व ती सर्वांसच साधते असें नाहीं, व साधली तरी सर्व लक्ष तिकडे ठेवावें लागल्यामुळें मज्जातंतूंवर ताण पडतो. यामुळें कित्येक लोकांची पचनशक्ति कमी होते, झोंप येत नाहीं, व कित्येकांच्या पौरुषावर सुद्धां धाड येते. या मार्गाचें अवलंबन करणारांनीं इतकें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं शुक्राचा एक थेंब सुद्धां योनिमार्गांत पडतां कामा नये इतकेंच नाहीं, तर त्याचा एक कणही स्त्रीच्या बाह्येंद्रियास ( आकृति १) सुद्धां लागतां कामा नये. तेथूनही शुक्रजंतु आंत जाऊन गर्भाशयापर्यंत पोंचल्याचीं उदाहरणें आहेत. डॉ. नॉरमन् हेअर यांचा अनुभव असा आहे कीं हा मार्ग शेंकडा ७३ वेळां फसतो. सारांश दुसरीं साधनें मिळणें ज्यांना शक्य आहे त्यांनीं या मार्गाचें अवलंबन करूं नये.

२. पिशवी:—पुरुषाच्या जननेंद्रियावर बरोबर बसतील अशा रबराच्या किंवा आंतड्याच्या पिशव्या बाजारांत मिळतात. यांस इंग्रजींत फ्रेंच लेटर म्हणतात. अशी पिशवी जननेंद्रियावर चढविलेली असल्यास संभोगाचे वेळीं रेत या पिशवींत पडतें व गर्भाशयांत पोंचू शकत नाहीं (आकृति ७ ). या आकृतींत पिशवी बसवलेलें पुरुषाचें इंद्रिय गर्भाशयाचे तोंडाजवळ दाखविलें आहे. या पद्धतींत एक मोठा दोष आहे. संभोगकालीं स्त्रीपुरुषांच्या जननेंद्रियांचा एकमेकांस स्पर्श होणें दोघांसही प्रकृतीच्या दृष्टीनें हितावह असतें, व रबराची पिशवी वापरल्यानें हा स्पर्श बंद होतो. शिवाय ही पिशवी पातळ असेल तर फाटण्याचा संभव असतो व अर्थात ती फाटल्यास निरुपयोगी आहे. ती जाड असेल तर फाटणार नाहीं व संततिप्रतिबंध होईल, परंतु याचे प्रकृतीवर परिणाम जवळ जवळ मुष्टिमैथुनाइतकेच वाईट होतात. डॉ. नॉरमन हेअर म्हणतात, हा उपाय फसण्याचें प्रमाण शेंकडा ५४ आहे. आंतड्याची पिशवी वापरण्यास फारशी हरकत नाहीं कारण ती मजबूत असूनही अतिशय पातळ असते, असें डॉ. फॉरेल यांचे मत आहे. ही पिशवी धुवून पुनः पुनः वापरतां येते म्हणून स्वस्त पडते.

पिशव्यांविषयीं कांहीं लोकांची अशी समजूत असते कीं त्यांनीं गुप्त रोगांपासून बचाव होतो. परंतु ही भयंकर चूक आहे. पिशवी न फाटल्यास परम्यापासुन बचाव होईल, परंतु गर्मीपासुन होणार नाहीं. कारण परम्याचे जंतु पुरुषाचे मूत्रमार्गांत शिरून तेथें फैलावतात, व ते स्त्रीच्या योनिमार्गांतून पुरुषाचे मूत्रमार्गांत जाण्यास पिशवीनें अडथळा होईल. परंतु गर्मीचा चट्टा स्त्रीचे जननेंद्रियाच्या आसपास कोठेंही असूं शकेल ( इतकेंच नव्हे तर सर्व शरीरावर कोठेंही असूं शकेल ) व तेथून गर्मीचे जंतु पुरुषाचे जननेंद्रियाचे आसपास कोठें तरी चिकटतील, व सधी साधून पिशवी काढल्यानंतरही शरीरांत घुसतील. गुप्तरोगांपासून बचावाचे मार्ग वेगळे* आहेत, व त्यांनीं खात्रीनें बचाव होतो, परंतु त्यासंबंधीं येथें विस्तारानें लिहिण्याचें कारण नाहीं.

३. **रेतवाहक नलिकांचा छेदः**—रेतजंतु अंडामध्यें तयार होतात हें वर सांगितलेंच आहे. तेथून ते रेतवाहक नलिकांतून मूत्रमार्गापर्यंत पोंचतात. अर्थातच या नलिका तोडल्यास त्यांना अंडामधून बाहेरच पडतां येणार नहीं. कांहीं

---

* याच लेखकाचें ' गुप्त रोगांपासून बचाव ' हें पुस्तक पहा.

दिवसांनीं शुक्रजंतूंची उत्पत्तीच बंद होते. तरी पण वीर्यामध्यें जे इतर द्रव मिश्र असतात ते कायम असल्यामुळें संभोगाचे वेळीं रेतस्खलन नेहमींप्रमाणेंच होतें, त्यांत फरक भासत नाहीं, हा शस्त्रप्रयोग अत्यंत साधा असून त्याची जखम सामान्यतः आठ दहा दिवसांत बरी होते.



आकृति ८.
शस्त्रक्रियाः—पहिला छेद.

यास क्लोरोफॉर्मची जरूर नसते. यानें एकंदर प्रकृतीवर अत्यंत हितावह परिणाम होतो इतकेंच नव्हे तर यापासून कामवासना बिलकूल कमी होत नाहीं व ती तृप्त करण्याची शक्तीही पूर्ववत् राहते. यांत तोटा एकच आहे कीं यानें संतति कायमची बंद होते, म्हणजे ही शस्त्रक्रिया करून घेतलेला पुरुष जर संततीची इच्छा करील तर ती त्याकडून पुरी होणें शक्य नाहीं. याचकरतां ज्या नीचप्रकृति लोकांस चांगली संतति होणें शक्य




आकृति ९. शस्त्रक्रियाः—दुसरा छेद.

नाहीं अशांवर हा प्रयोग अमेरिकेंत कांहीं ठिकाणीं करतात. यासंबधीं इंग्लंडमधील प्रसिद्ध शस्त्रवैद्य डॉ. नॉरमन हेअर म्हणतातः ' रोगांमुळें किंवा इतर कारणांमुळें ज्यांना संतति होणें समाजास धोक्याचें आहे अशा सर्व लोकांनीं शस्त्रक्रिया करून घेण्यास तयार झालें पाहिजे. रोग्याच्या विनंतीवरून व त्याच्या खर्चानें ही शस्त्रक्रिया करण्यास कायद्याची परवानगी आहे. प्रत्येक रेतवाहक नलिकेचा एक किंवा दोन इंच लांबीचा तुकडा कापून काढल्यास काम होतें. यानें एकंदर प्रकृति सुधारते असा माझा अनुभव आहे. '

हा शस्त्रप्रयोग करून घेतलेले दोन हिंदी गृहस्थही आम्हांस माहीत आहेत व त्यांचाही अनुभव असाच आहे.

४. हल्लीं कांहीं रोगांमध्यें क्ष-किरणांचा उपयोग करीत असतात, यांचा प्रयोग केल्यासही वरील शस्त्रक्रियेसारखाच परिणाम होतो. परंतु पॅरिस येथील डॉ. बलो यांनीं नुकत्याच ( २१ जुलै १९२३ ) प्रसिद्ध केलेल्या आंकड्यांवरून असें दिसतें कीं या किरणांचा परिणाम फार दिवस टिकत नाहीं. शिवाय हा परिणाम संपतां संपतां गर्भधारणा झाल्यास मुलें दोषी निपजण्याचा संभव असतो. तेव्हां हा मार्ग इष्ट नाहीं.

## स्त्रियांनीं अमलांत आणण्याचे उपाय.

१. **रजोगोलापर्यंत शुक्रजंतूंनां पोंचतां येऊं नये म्हणून वाटेंत अटकाव करणें.** असा अटकाव करण्याकरतां जे पदार्थ वापरतात त्यांपैकीं स्पंज हा एक होय. हा खडबडीत नसावा व त्यांतील छिद्रें मोठीं असूं नये. असे निवडक स्पंज ( साध्या स्पंजपेक्षां रबरी स्पंज बरा, कारण तो पाण्यांत उकळून स्वच्छ करतां येतो ) बाजारांत मिळतात. यांचा व्यास अजमासें दोन इंच असावा. हा साबणानें स्वच्छ धुवून धूळ बसणार नाहीं अशा जागीं ठेवावा व समागमापूर्वी

वीस मिनिटें जंतुनाशक पाण्यांत * बुडवून योनिमार्गांत जाईल तितका खोल घालावा ( आकृति १० ). किंवा जंतुनाशक पाण्या-ऐवजीं टांकणखार व व्हॅसेलीनचें मिश्रण त्यावर सर्व बाजूंनीं चोपडावें. या उपायानें शुक्रजंतूंस अटकाव होतो इतकेंच नाहीं.




( आकृति १०. )

१ मलाशय. २ योनिमार्ग ३ गर्भाशय. ४ स्पंज. ५ मूत्राशय.

---

* एका मोठ्या बाटलीभर पाण्यांत एक तोळा तुरटी किंवा चार मोठे चमचे मीठ टाकल्यास जंतुनाशक पाणी तयार होतें.



तर त्यांचा नाश होतो. समागमानंतर स्रवडीप्रमाणें जंतुनाशक पाण्यानें योनिमार्ग पिचकारीनें ( आकृति ११ ) धुवावा व नंतर स्पंज काढून साफ धुवून ठेवावा. य उपायांत हा दोष आहे कीं स्पंज लहान असल्यास इकडे तिकडे सरकण्याचा संभव असतो व मोठा असल्यास योनिमार्ग थोडाबहुत विस्तृत होतो. हा उपाय डॉ. नॉरमन हेअर यांच्या म्हणण्याप्रमाणें शेंकडा ७५ वेळां फसतो.

रेतजंतूंस अटकाव करण्याचा दुसरा एक

**आकृति ११.** प्रकार म्हणजे गर्भाशयाचे तोंडावर बरोबर बसण्यासारखी रबरी टोपी. ( आकृति १२ ) या टोपीस इंग्रजीमध्यें ' पेसरी ' असें नांव आहे ( गर्भाशयास आधार देण्याकरतां एक ' पेसरी ' वापरीत असतात ती ही नव्हे ). अशा तीन चार प्रकारच्या टोप्या मिळतात. या लहान, मध्यम व मोठ्या अशा तीन मापांच्या असतात. गर्भाशयाचें तोंड कोठें असतें हें

बरोबर माहीत असल्यास स्त्रियांस या टोप्या आपल्या आपणच



आकृति १२

बसवतां येतात. स्त्रीनें आपलें मधलें बोट योनिमार्गांत जाईल तितकें घातल्यास शेवटीं एक पुढें आलेलें मांसमय टोंक लागेल. याच्या सभोंवतीं मोकळी जागा असते, व या टोंकावरच वर सांगितलेली रबरी टोपी बसवावयाची असते. या टोंकाचा मध्यभाग थोडासा आंत गेलेला असतो व मध्यभागीं द्वार असतें. हेंच गर्भाशयाचें मुख. रबरी टोपीनें हें मुख झांकलें जाऊन टोपी बरोबर बसल्यास शुक्रजंतूंस मुखापर्यंत पोंचण्यास अटकाव होतो.



आकृति १३

( आकृति १६ ) परंतु गर्भाशयाचें टोंक निमुळतें असल्यामुळें ही नीट बसत नाहीं व बसण्याइतकी घट्ट असल्यास त्रास होतो. शिवाय कधीं कधीं योनिमार्गाची लांबी मधल्या बोटापेक्षां जास्त असते, व तशी असल्यास ही टोपी स्त्रीस स्वतः बसवितां येणार नाहीं, व बाळंतपणांत फाटल्यामुळें हें टोंक वांकडें तिकडें झालें असल्यास

डॉक्टरांसही बसवतां येणार नाहीं. म्हणुन पुढें सांगितलेला दुसरा प्रकार अधिक चांगला.

पेसरीचा दुसरा प्रकार अर्धगोलाकृति असून तिच्या कांठामध्यें पोलादी स्प्रिंग असते ( आकृति १३ ). हिची फुगीर बाजू गर्भाशयाकडे करून बसविली असतां हिचा कांठ स्प्रिंगमुळें योनिमार्गाचे बाजूंस चिकटून बसतो.



आकृति १४.

ही पेसरी बसविण्यास जास्त सोपी असते व एकदां पाहिल्यावर कोणत्याही स्त्रीला ती स्वतः बसवतां येते. ही प्रथम आकृति १४ मधें दाखविल्याप्रमाणें धरून नंतर आकृति १५ प्रमाणें दाबावी, व योनिमार्गांत जाईल तितकी खोल घालावी ( आकार बरोबर निवडल्यास जवळ जवळ सबंध आंत जाईल ). नंतर शेवटचें टोंक आंत व वरचे बाजूस ढकलावें.



आकृति १५ बी.

म्हणजे तें वरच्या हाडाचे मागें जाऊन बसेल (आकृति १६). हा उपाय बहुधा फसत नाहीं.

या दोन्ही प्रकारच्या पेसरींचा व वर सांगितलेल्या स्पंजाचा उपयोग एकच. पेसरी दररोज सवडीनें धुवून साफ करून पुनः बसविणें बरें, परंतु योनींतून कोणत्याही प्रकारचा स्राव




आकृति १६

१. मलाशय. २. योनिमार्ग. ३. मूत्राशय. ४. रबरी टोपी ( पहिल्या प्रकारची ). ५ गर्भाशय.

होत नसल्यास कांहीं दिवस ही आंत राहिली तरी चालते. फक्त ही त्रास होईल इतकी घट्ट किंवा भोंवती जागा राहील इतकी सैल



**आकृति १७:–दुसऱ्या प्रकारची टोपी**

असूं नये. काम नसेल तेव्हां रबरी पेसरी साबणानें स्वच्छ धुवून पुसून वर फ्रेंच चॉक्, टाल्क पावडर किंवा बोरिक पावडर लावून ठेवावी, म्हणजे जास्त दिवस टिकते. अर्थात् तिला छिद्र पड-ल्यास ती निरुपयोगी आहे, हें सांगावयास नकोच. स्पंज किंवा 'पेसरी' आंत बसवतांना बोटें व नखें अत्यंत स्वच्छ ठेवण्याची खबरदारी घेतली पाहिजे. नाहीं तर रोगजंतु आंत जाण्याची भीति असते.

पेसरीचा आणखी एक प्रकार सोनें, चांदी, प्लॅटिनम् किंवा कांचेचा केलेला असतो. याचा आकार जवळ जवळ खमी-साच्या बटनाप्रमाणें असतो. फरक इतकाच कीं याचा दांडा पोकळ असून त्यास आरपार भोंक असतें. ही बसविली म्हणजे बुंधाचा रुंद भाग गर्भाशयाचे मुखाबाहेर राहून बाकीचा भाग गर्भाशयांत जातो. ही बसविण्यास डॉक्टराची मदत लागते, परंतु ही पोकळ असल्यामुळें ऋतुस्रावास अडचण होत नाहीं, तेव्हां वारंवार काढण्याचें कारण नाहीं. परंतु यानें गर्भधारणा मात्र बंद होणें शक्य नाहीं. उलट शुक्रजंतूंस गर्भाशयांत शिरण्यास मोकळी वाट करून दिल्यासारखी होते, व गर्भधारणेचा संभव वाढतो.

मात्र गर्भाची वाढ होऊं लागल्यावर गर्भाशयांतील टोंकानें गर्भा-सभोंवतींचें वेष्टन फाटतें व गर्भनाश होतो. हा प्रतिबंधाचा उपाय नव्हे, गर्भनाशाचा उपाय आहे, ह्मणून आम्ही याची शिफारस करूं शकत नाहीं. शिवाय यानें रोगजंतूंसही गर्भाशयांत शिरण्यास मोकळी वाट होते, यामुळें हा वापरण्यांत बराच धोका आहे.

२. **रासायनिक उपाय.** यांचा उद्देश रेतजंतूंची हालचाल नष्ट करण्याचा असतो. याकरतां काकाओ ( कोको ) चें तेल व कोयनेल यांच्या मिश्रणाच्या वडया बाजारांत मिळतात. यांसही ' पेसरी ' हेंच नांव आहे. यांतील एक वडी प्रत्येक समागमाचे अगोदर पांच मिनिटें योनिमार्गांत जाईल तितकी खोल घातल्यास तेथें ती वितळून पसरते व त्यांतील कोयनेलानें शुक्रजंतूंचा नाश होतो. यांतील थोडें बहुत कोयनेल स्त्रीच्या अंगांत भिनण्याचा संभव आहे परंतु थोडया प्रमाणांत कोयनेल शक्तिवर्धक असल्यामुळें त्या पासुन तोटा नाहीं. तथापि क्वचित एखाद्या स्त्रीस कोयनेल सोसत नसेल तर तिनें पुढें सांगितलेल्या दुसऱ्या वडया वापराव्या. यांत कोयनेल नसतें पण दुसरें एक जंतुनाशक द्रव्य असतें. नंतर सवडीप्रमाणें योनिमार्ग साफ

धुवावा. हा मार्ग क्वचित् प्रसंगीं फसतो, तो असाः–गर्भाशयाचें द्वार सामान्यतः बंद असतें, परंतु तें संभोगकालीं स्त्रीस चेतना झाल्यास कमजास्त प्रमाणांत उघडतें. अशा स्थितींत पुरुषाच्या इंद्रियाचें द्वार त्याच्या बरोबर समोर लागल्यास ( आकृति ७ ) रेतजंतु एकदम गर्भाशयांत जाऊं शकतात व गर्भधारणाही होऊं शकते. डॉ. नॉरमन् हेअर म्हणतातः ' पुष्कळ वेळां पेसरी बनवणारे लोक जास्त फायद्याच्या आशेनें कोयनेल मुळींच घालीत नाहींत, म्हणूनही हा उपाय फसतो. माझ्या अनुभवांत हा उपाय शेकडा ७१ उदाहरणांत फसलेला आहे. ' पेसऱ्या कोकोचे तेलाच्या केलेल्या असतात त्यामुळें त्यांस उग्र वास असतो, व हवामान उष्ण असेल तेथें त्या वितळून जातात. याकरतां हल्लीं एक नवीन प्रकारची वडी निघाली आहे, ती कितीही उष्णता असली तरी वितळत नाहीं परंतु योनिमार्गांतील ओलसरपणानें विरघळते. ही तेलकट नसून हिला वास येत नाहीं, व कपड्यास डागही पडत नाहीं. या ऐवजीं कोयनेल किंवा दुसऱ्या जंतुनाशक पदार्थाचें मलम योनिमुखास व योनिमार्गास लावल्यासही चालेल. अशा प्रकारचें मलम विकत मिळतें.

**खात्रीचा उपाय:** पहिल्या उपायांत सांगितलेली रबराची 'पेसरी' अगदीं बरोबर बसली नसल्यास तोही खात्रीचा उपाय नव्हे, व दुसरा उपायही कधीं कधीं फसतो. परंतु दुसऱ्या उपायांतील जो दोष सांगितला तो पहिल्या उपायानें काढून टाकतां येतो. म्हणजे जरी रतिकालीं गर्भाशयाचें तोंड उघडलें तरी तें रबरी पडद्यानें झांकलेलें असल्यास रेतजंतु एकदम आंत जाण्याची भीति नाहीं. तेव्हां बिलकूल गर्भधारणा होतां कामा नये अशी इच्छा असल्यास हे दोन्ही उपाय एकदम वापरले पाहिजेत. म्हणजे रबरी टोपी केव्हांही सवडीप्रमाणें बसवून ठेवावी व प्रत्येक समागमाचे अगोदर वर सांगितलेली एक वडी योनि-मार्गांत घालावी, म्हणजे गर्भधारणा होणें अशक्य होईल ( अर्ध-गोलाकृति पेसरी वापरल्यास वडी घातल्यानंतर रबराची पेसरी घालावी ). या ऐवजीं कधीं कधीं रबरी टोपीसच जंतुनाशक मलम लावतात. मलावरोध झाल्यास आंतड्याचा दाब योनि-मार्गावर पडून बसवलेली टोपी निसटून जाण्याचा संभव असतो, म्हणून ही वापरणाऱ्या स्त्रियांनीं पोट साफ ठेवण्याची खबरदारी घ्यावी. हें प्रकृतीच्या दृष्टीनेंही हितावहच आहे.

३. पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांवरही शस्त्रक्रिया करून गर्भधारणा बंद करतां येते, परंतु अर्थातच ती कायमची बंद होते. याकरितां अंडाशयापासून गर्भाशयापर्यंत रजोगोल ज्या मार्गानें जातात त्या अंडवाहक नलिकांचा एक एक तुकडा कापून काढला म्हणजे काम होतें. या नलिका मजीबात काढून टाकल्यास त्याहीपेक्षां बरें. यांत स्त्रीचें पोट कापावें लागत असल्यामुळें ही पुरुषांच्या शस्त्रक्रियेइतकी साधी नाहीं. परंतु या शस्त्रक्रियेनें स्त्रीच्या प्रकृतीस कोणत्याही प्रकारची इजा होत नाहीं, व ज्यांस संतति होणें इष्ट नाहीं अशा नीचप्रकृति स्त्रियांवर अमेरिकेंतील कित्येक संस्थानांत हा प्रयोग केला जातो.

४. पुरुषांप्रमाणेंच स्त्रियांवरही क्ष-किरणांचा उपयोग होऊं शकतो, परंतु त्याच कारणाकरतां तो इष्ट नाहीं.

५. रेडिअम् धातूंतून निघणाऱ्या किरणांचाही या कामीं उपयोग होतो. याकरतां रेडिअम् कांचेच्या नळ्यांत घालून त्या नळया गर्भाशयांत कांहीं वेळ घालून ठेवतात. हे किरण निघतांना या धातूचा नाश होत असतो. याप्रमाणें १० मिलिक्युरीं (हें त्याचें माप आहे) चा नाश झाल्यास स्त्री एक दोन वर्षे वंध्या

होते, व १५ चा नाश झाल्यास ती कायमची वंध्या होते, असा अनुभव आहे.

जपानमध्ये संततिनियमनाची माहिती गरीब लोकांस नाहीं. परंतु जपानी वेश्या वर सांगितलेल्या स्पंजा ऐवजीं अतिशय नरम कागद ( बाजारांत ' टॉयलेट पेपर ' म्हणून मिळतो तो ) गर्भाशयाचे द्वारापुढें बसवतात, व समागमानंतर योनिमार्गं आंत बोट घालून गरम पाण्यानें साफ धुवून काढतात. यामुळें वेश्यांमध्यें गर्भधारणा बहुधा होत नाहीं.

केवळ स्वच्छतेच्या दृष्टीनेंही, दांत घासणें किंवा तोंड धुणें जसें आवश्यक आहे तसेंच प्रत्येक स्त्रीनें योनिमार्ग धुवून स्वच्छ ठेवणें आवश्यक आहे. याकरतां शक्य असल्यास आकृति ११ मध्यें दाखविलेली पिचकारी वापरावी, व साबणाचे पाण्यानें किंवा जंतुनाशक पाण्यानें योनिमार्ग धुवून काढावा.

कुमारिकांचे योनिमार्गाचे तोंडाशीं एक पडदा असतो व तो प्रथम समागमाचे वेळीं फाटतो म्हणून यास कौमार्याची खूण समजण्याचा प्रघात + आहे. यांत एक छिद्र असतें त्यांतून ऋतु-

---

+ ही समजूत सर्वथैव खरी नाहीं. ऋतुस्रावास [illegible]

स्राव बाहेर येतो. आकृति ११ मधील पिचकारीचें टोंक आड असल्यामुळें हा पडदा फाटण्याचा संभव आहे, तेव्हां कुमारिकांनीं या पिचकारीऐवजीं एनिम्याची बारीक नळी वापरावी, म्हणजे कौमार्याची खूण शिल्लक राहील



---

होते व स्वच्छतेच्या दृष्टीनें हा पडदा शस्त्रक्रियेनें काढून टाकलेला बरा. वरील खोटया समजुतीमुळें यास नसतें महत्त्व आलेलें आहे. हा पडदा प्रथम संभोगांत फाटून रक्त येतें त्यांत हातरुमाल भिजवून तो कौमार्याचा पुरावा जमलेल्या इष्टमित्रांस दाखवण्याची चाल कांहीं लोकांत आहे. कौमार्य अगोदरच नष्ट झालें असलें तरी सुद्धां विवाहानंतरच्या प्रथम समागमाचे वेळीं नाटकी हावभावांनीं व इतर युक्त्यांनीं नवऱ्याला फसवणें शक्य असतें.

# पुरवणी १.

## ब्रह्मचर्य.

ब्रह्मचर्यासंबंधाच्या पारंपरिक कल्पना—म्हणजे ब्रह्मचर्यानें शरीरावर नेहमीं चांगलाच परिणाम झाला पाहिजे, रतिक्रिया हें सामान्यत: पाप आहे परंतु विवाहाच्या मंत्रांनीं त्यांतील पाप नाहींसें होतें, तरी विवाहित माणसांनीं सुद्धां केवळ प्रजाजननापुरताच संभोग केला पाहिजे—वगैरे प्रकारच्या कल्पना आधुनिक शास्त्रीय दृष्टीनें चुकीच्या आहेत. ऐहिक सुखापासून विरक्त राहण्यांत पुण्य आहे व या जगांत जितके स्वतःचे अधिक हाल करून घ्यावे तितकें मरणानंतर जास्त सुख होणार अशी कल्पना जवळ जवळ प्रत्येक धर्मांत आढळते. पारलौकिक सुख काय आहे, व आहे किंवा नाहीं, हें धार्मिक लोकांसही कल्पनेनेंच ठरवावें लागतें. या कल्पनेच्या खेळानें ज्यांचे समाधान होत असेल त्यांनीं खुशाल स्वतःचे शक्य तितके हाल करून घ्यावे. परंतु आधुनिक शास्त्रदृष्टीला ही कल्पना

मान्य नाहीं. याकरतां ऐहिक सुखाचाच विचार करणें भाग आहे. अशा रीतीनें विचार केला असतां, मनुष्याच्या ज्या नैसर्गिक प्रवृत्ति आहेत आणि ज्यांच्या योग्य तृप्तीवर ऐहिक सुख अवलंबून असतें त्या दाबून टाकण्याचें विशेष कारण आहे असें वाटत नाहीं. स्वतंत्र विचाराच्या बाबतींत मनुष्य अत्यंत आळशी असल्यामुळें वरवर विचार करणारे लोक नकळत पारंपरिक पद्धतीनेंच विचार करतात आणि 'येन केन प्रकारेण' शास्त्रीय ज्ञानाची आणि परंपरेची सांगड घालण्याचा प्रयत्न करतात. अशा रीतीनें, उपास करण्याच्या धार्मिक परंपरेस पुष्टि देण्याकरतां 'प्रत्येक मनुष्य वाजवीपेक्षां फाजील खातो तेव्हां प्रत्येक मनुष्यानें मधून मधून उपास केले पाहिजेत' असें विधान करण्यांत कांहीं आधुनिक विद्वान सामील आहेत. *

---

* अमेरिकेंतील प्रसिद्ध डॉ. रॉबिनसन यांनीं या बाबतींत असें लिहिलें आहे:—कांहीं लोक जास्त खातात हें खरें परंतु बरेच लोक वाजवीपेक्षां कमी खातात हेंही खरें आहे. ज्यांना गरीबीमुळें कमी खावें लागतें ते सोडून दिले तरी पुष्कळ लोक गरीब नसूनही

ब्रह्मचर्याची तीच स्थिति आहे. पारंपरिक डॉक्टरांनीं व इतर लोकांनीं 'ब्रह्मचर्यापासून कोणत्याही प्रकारचा तोटा होत नाहीं' असें विधान ठोकून दिलें आहे. परंतु ज्यांनीं कामशास्त्राचा विशेष अभ्यास केला आहे, असे आधुनिक डॉक्टर काय म्हणतात तें पाहूं.

---

संवयीनें किंवा अन्य कारणांनीं वाजवीपेक्षां कमी खातात व त्यांचे हातून पुरेसें काम होत नाहीं. आपण खातों त्याच्या निम्मे किंवा चतुर्थांश अन्नानें आपलें काम भागेल असें कांहीं विक्षिप्त म्हणत असतात, परंतु अशा बरळण्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. ज्याला काम करावयाचें असेल त्यानें भरपूर व सकस अन्न खाल्लें पाहिजे. कोंबडीच्या पिल्लाइतका ज्याचा आहार, त्याच्या हातून काम काय होणार ?

वजन कमी करण्याकरतां अमेरिकेंतील प्रसिद्ध लेखक बर्नार्ड मॅकफॅडन् यांच्या उपदेशाप्रमाणें उपास करून एक गृहस्थ दोन महिन्यांत वारल्याचें डॉ. ईव्हॅन्स् यांनीं नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे ( १९२४ ). उपास सुरू करण्यापूर्वी यांचें वजन १७० पौंड व वय २८ वर्षें होतें.

प्रोफेसर फॉरेल, एम्. डी., पी. एच्. डी., एल्. एल्. डी. म्हणतातः ' १. ब्रह्मचर्यामुळें पुरुष नपुंसक होऊं शकतो. २. पतीस पत्नीपासून अलिप्त राहण्यास सांगण्यात दोन धोके आहेत. तो वेगळ्या खोलींत निजून खरोखर ब्रह्मचारी राहिला तर त्या दंपत्याचें प्रेम कमी होत जाईल, किंवा तो दुसऱ्या एखाद्या स्त्रीच्या प्रेमपाशांत सांपडल्यास कौटुंबिक सुखाचा निकाल लागेल. स्त्रीस किंवा पुरुषास सामान्यतः थोडा बहुत त्रास सोसून ब्रह्मचारी राहतां येईल हें खरें, तरी पण ज्यांचे मज्जातंतु जोरदार नसतील त्यांना अतिशय मानसिक त्रास होईल. या कारणानें वेड लागलेल्या स्त्रिया व पुरुषही मी स्वतः पाहिले आहेत. ३ कामवासना ताब्यांत ठेवण्याच्या कामांत निराश झाल्यामुळें आपलें अंडयुग्म कापून काढणाऱ्या ख्रिस्ती साधूचें उदाहरण कॅनडा मधील सुधारक ' शिनिकी ' यानें दिलें आहे. ४. एका श्रीमंत, सुशिक्षित कुमारिकेनें मजजवळ असें सांगितलें: ' माझें जर लवकर लग्न झालें नाहीं तर मला बिलकूल राहवणार नाहीं पाहिजे त्या पुरुषाबरोबर मी जाईन. '

इतर इंद्रियांप्रमाणेंच जननेंद्रियाचें आरोग्य त्याच्या योग्य उपयोगावर अवलंबून असतें. पारंपरिक लोक ब्रह्मचर्याचे मोठे

गातांना हें अजीबात विसरून जातात. **डॉ. ड्रिसडेल** यांनीं या संबधानें असें लिहिलें आहे. १. सर्व स्नायु, मज्जातंतु, मांसग्रंथि इत्यादिकांचें पोषण व आरोग्य त्यांच्या नियमित व्यापारावर अवलंबून असतें, तर यांनींच बनलेल्या जननेंद्रियास हाच कायदा कां लागणार नाहीं ? २. रोगनिदानाच्या दृष्टीनें पाहतां ब्रह्मचर्यापासून मुष्टिमैथुन वगैरे घातुक संवयी, व अनेक रोग उद्भवतात. स्त्रियांस गर्भाशयोन्माद, नीरक्तता व मानसिक रोग, व पुरुषांस क्लैब्य, नकळत वीर्यस्राव व रोगभ्रम होतात. हे रोग कधीं कधीं इतर कारणांनींही होतात. परंतु गर्भाशयोन्माद शेंकडा नव्याण्णव वेळां ब्रह्मचर्यानें होतो असें एका विद्वान डॉक्टराचें मत आहे ( **व्हिलरमे** ). या रोग्यांपैकीं बरेच रोगी लग्नानंतर आपोआप बरे होतात यापेक्षां यास निराळा पुरावा काय पाहिजे ? ३. वर सांगितलेल्या रोगांमध्यें औषधोपचाराचा क्वचितच उपयोग होतो. जननेंद्रियास नैसर्गिक व्यायाम मिळाल्यास हे रोग आपोआप बरे होतात. ४. या बाबतींत पुरुष लग्नाशिवायही हा उपाय करूं शकतात. परंतु सामाजिक बंधनांमुळें स्त्रियांची स्थिति मात्र कठिण होते. स्त्रियांस लग्न एवढाच उपाय असतो. पण रोगी स्त्रीचें लग्न होणें सोपें नस-

त्यामुळें पुष्कळ वेळां हा उपाय अशक्य होऊन रोग असाध्य होतो !

डॉ. रॉबिन्सन्, एम्. डी. म्हणतात. १. रतिक्रिया प्रजाजनापुरतीच करावी असें ज्यांचें मत असेल त्यांनीं लग्न करणें म्हणजे निव्वळ फसवणूक आहे व हें कारण घटस्फोट करण्यास पुरेसें समजावें. २. नैसर्गिक रतिक्रियेच्या अभावीं घातुक संचयी लागण्यापेक्षां, किंवा कडक ब्रह्मचर्यामुळें ( ही फक्त बीस बावीस वर्षांपुढें ब्रम्हचर्य पाळणारांची गोष्ट आहे ) नपुंसकत्व येण्यापेक्षां अविवाहित पुरुषांनींही नैसर्गिक प्रकाराचा अनुभव घेणें बरें. ( स्त्रियांचे बाबतींत सामाजिक बंधनें अधिक कडक असल्यामुळें त्यांनीं तसेंच करणें हितावह असलें तरी शहाणपणाचें होणार नाहीं. ) ३. अतृप्त कामवासनेसारखी दुसरी शिक्षा नाहीं. पुरुष ब्रम्हचारी असेल तर तो नपुंसक आहे कीं काय हें नुसत्या तपासणीनें सुद्धां कळणें शक्य नाहीं. ( नपुंसकत्वाचे अनेक प्रकार आहेत, त्यांपैकीं वीर्यपतन फाजील लवकर होणें हा एक आहे, व अशा पुरुषापासून स्त्रीस तृप्ति होणें शक्य नाहीं. हा प्रकार वस्तुतः स्त्रीसमागमा-



शिवाय कळणें शक्य नाहीं. ) अशा नपुंसक ब्रह्मचाऱ्यानें लग्न केल्यास त्याच्या स्त्रीस ती जन्मभर शिक्षाच म्हणावयाची. असें दंपत्य कधींही सुखी होणें शक्य नाहीं. ४. अशा नवऱ्यापेक्षां गुप्त रोग असलेला नवरा स्त्रीच्या दृष्टीनें बरा. म्हणजे, रोगी पुरुषापासून स्त्रीस संसर्ग होऊं न देणें सोपें आहे; परंतु नपुंसकत्व बरें करणें कठिण आहे व कित्येक वेळां अशक्य होतें. त्यांतून अशा दुर्दैवी स्त्रियांस आपलें दुःख बोलूनही दाखवितां येत नाहीं ! ५. अमेरिकेंत किंवा इतर ठिकाणीं घटस्फोटाकरतां जे मुकद्दमे येतात त्या बहुतेकांच्या मुळाशीं अतृप्त कामवासना असते. अर्थात् हें कारण कोर्टांत बाहेर येत नाहीं, व त्याचें नपुंसकत्व हेंच नेहमीं कारण असतें असेंही नाहीं. परंतु कांहीं शारीरिक किंवा मानसिक कारणांनीं परस्परांची कामवासना त्यांचेकडून तृप्त होत नाहीं. ती जर तृप्त होत असेल तर इतर दोषांकडे फारसें लक्षच जात नाहीं. ६. असे पुरुष लग्न कां करतात हें समजणें कठिण आहे. लग्नानंतर दहा वर्षें अविद्धयोनि असलेल्या स्त्रिया माझ्या पाहण्यांत आहेत व पंचवीस वर्षांत एकदांही कामेच्छा तृप्त न झालेल्या विवाहित स्त्रिया ही असतात. परंतु अशा स्थितींत देखील त्यांस मुलें होतच असतात, व या

दोन्ही कारणांनीं त्यांच्या प्रकृतीची दुर्दशा होत जाते.
७. पुरुषांमध्यें तेराव्या वर्षापासून पंधराव्या वर्षापर्यंत कामवासना जागृत होते, तरी एकंदरीनें इल्लींच्या समाजस्थितीच्या दृष्टीनें त्यांनीं वीस बाविसाव्या वर्षापर्यंत ब्रह्मचर्य पाळणें इष्ट आहे हें मुलांस समजावून सांगितलें पाहिजे. कामवासना ताब्यांत ठेवणें हें सोपें काम नाहीं तरी तेथपर्यंत आत्मसंयमन केल्यापासून फारसें नुकसान नाहीं व हें प्रयत्नानें सामान्यतः शक्य असतें. परंतु पुढें काय? चोवीस पंचवीस वर्षांच्या किंवा त्याहून मोठया पुरुषांस काय उपदेश करावा? याचें उत्तर त्यांच्या कामप्रकृतीवर अवलंबून राहील. कांहीं पुरुषांस तीस वर्षांपर्यंत सुद्धां ब्रह्मचर्य जड जात नाहीं. ज्यांची कामवासना जात्याच कमी आहे त्यांना हें सोपें आहे. ज्यांचें अभ्यासांत लक्ष लागलें आहे किंवा कांहीं महत्त्वाच्या शास्त्रीय शोधांत जे गुंतले आहेत त्यांनाही हें फारसें कठिण नाहीं. त्यांना थोडा-बहुत मानसिक त्रास मधून मधून होईल परंतु फारशी इजा होणार नाहीं. परंतु कांहीं पुरुषांस बावीस किंवा पंचविसाव्या वर्षांचे पुढें ब्रह्मचर्य केवळ अशक्य होतें. त्यांची मानसिक स्थिति

अत्यंत करुणाजनक होते. त्यांना झोंप येत नाहीं, अन्न जात नाहीं, कोणत्याही विषयाकडे मन लागत नाहीं. या मानसिक झगडयांत त्यांची सगळी शक्ति खर्च होते व ते तिरसट बनतात. कांहीं कालानें त्यांना रोगभ्रम होतो. अशा पुरुषांनीं लग्न करावें हें खरें, परंतु तें जर कांहीं कारणानें अशक्य असेल तर त्यांना बेकायदा व्यवहार करण्याचा उपदेश करावा इतकेंच नव्हे तर त्यांस हर-प्रयत्नांनीं उद्युक्त करावें. त्यांनीं ब्रम्हचारी राहणें हाच समाज-दृष्टीनें जास्त गुन्हा आहे. मात्र त्यांस गुप्त रोगांपासून स्वतःचा कसा बचाव करावा हें बरोबर शिकविलें पाहिजे. जो दारु पीत नाहीं व थोडयाशा अकलेनें स्त्रीची निवड करतो त्याला गुप्त रोग होण्याचें बिलकूल कारण नाहीं. मात्र रोगप्रतिबंधक औषध वापरलें पाहिजे. ती स्त्री जर कुलीन असेल तर संतति-नियमनाची माहिती देणें जरूर आहे. अशा रीतीनें वाग-ण्यांत व्यक्तीचें व समाजाचें हित आहे व अहित कोणाचेंच नाहीं. या विषयावर धार्मिक लोकांनीं लिहिलेलीं पुस्तकें असत्य विधानांनीं भरलेलीं आहेत. अशा पुस्तकांचे तीन मुख्य दुष्प-रिणाम आहेत. मुष्टिमैथुन, नपुंसकत्व आणि ढोंग. ८. एक ३३

वर्षे वयाची कुमारिका अनेक डॉक्टरांकडे जाऊन शेवटीं मज-कडे आली. तिला उन्माद होऊन ती बेशुद्ध होऊन पडत असे. ती फिकट, मांसहीन झाली होती व तिची मानसिक स्थिति इतकी चमत्कारिक झाली होती कीं तिला वेड लागणार असें सर्वांस वाटूं लागलें. मी त्यांतील इंगित ताडलें असें तिला समजल्यावर तिनें कबुलीजबाब दिला. ही गोष्ट तिनें आधीं कोणासही सांगितली नव्हती. विसाव्या वर्षापर्यंत: ती चांगली सुदृढ असे, परंतु तेव्हांपासून अनावर व अतृप्त कामवासनेमुळें तिची अशी दशा झाली होती. ती हस्तमैथुनापासूनही अलिप्त राहिली होती. अर्थातच मी तिला स्पष्ट सांगितलें कीं तुझी प्रकृति कोणत्याही औषधोपचारानें सुधारणें शक्य नाहीं. याला एकच उपाय आहे, तो काय हें सांगण्याची जरूर नाहीं. कारण तुझ्या हकीकतीवरून तो तुलाही स्पष्ट समजेल. ती माझे आभार मानून निघून गेली. हें स्पष्टपणें सांगून औषध देण्यास नाकारण्याचें धैर्य व प्रामाणिकपणा किती डॉक्टरांत असतो ?

९. ब्रह्मचर्यापासून बिलकूल इजा होत नाहीं असें कित्येक डॉक्टर लिहितात. मी त्याच्या उलट पुष्कळ उदाहरणें देऊं

शकतों, व ह्या काळचें एक उदाहरण सुद्धां त्यांचें म्हणणें खोटें ठरविण्यास पुरे आहे. त्यांना कदाचित् अशीं उदाहरणें सांपडलीं नसतील इतकेंच. हल्लीं एक डॉक्टर मजकडे उपचाराकरतां येत असतो. रोगांच्या भीतीनें व नीतीच्या विचारांनीं त्याला पछाडल्यामुळें तो २४ व्या वर्षापासून ब्रह्मचर्य आचरूं लागला व ३४ व्या वर्षी त्याला लग्न करण्याची इच्छा झाल्यामुळें त्यानें आधीं आपलें पौरुष अजमावून पाहण्याचा यत्न केला; परंतु व्यर्थ. आतां त्याची प्रकृति सुधारत आहे परंतु जननेंद्रिय व अंडयुग्म सुकून गेल्यामुळें तो साफ बरा होणें शक्य नाहीं. दुसरा एक ३८ वर्षांचा ब्रह्मचारी लग्न करण्याच्या इच्छेनें तपासून घेण्याकरतां मजकडे आला. त्याच्या इंद्रियाची सर्व चेतना कित्येक वर्षांपासून नष्ट झाली होती, परंतु तें शाबूत असल्यामुळें मी त्यास सांगितलें कीं नपुंसकत्व आलें आहे कीं काय हें तपासून समजणार नाहीं, अजमावून पाहिल्यास समजेल. तो धार्मिक असल्यामुळें त्याला हा मार्ग पसंत न पडून त्यानें तसेंच लग्न केलें. त्याची बायको २४ वर्षांची आहे व तो पूर्णपणें नपुंसक ठरला!

**डॉ. टॅनेन्‌बॉम्, एम् डी.** लिहितातः—सर्व सुधारलेल्या देशांत मज्जातंतुविषयक रोगांचा जो अधिकाधिक फैलाव होत आहे त्याचें कारण समागमाविषयीं सामाजिक बंधनें होत. मज्जातंतूंवरचा ताण नाहींसा करण्यास नुसती रतिक्रिया पुरेशी होत नाहीं, तर संभोगकालीं कोणत्याही प्रकारचा त्रास, भीति किंवा अडचण वाटतां कामा नये. मन मोकळें असलें पाहिजे. नैसर्गिक मार्ग बंद किंवा अडचणीचा झाल्यामुळें पुष्कळ लोकांना निसर्गविरुद्ध संवयी लागतात. एकंदरींत कोणताही मनुष्य जर फार दिवस ब्रह्मचारी राहील ( फार म्हणजे किती हें प्रकृतीवर अवलंबून आहे ) तर खालीं लिहिल्यापैकीं कांहीं तरी परिणाम खास होतील ! अनेक निसर्गविरुद्ध संवयी, लहान मुलांवर व जनावरांवर बलात्कार, स्वप्नावस्था, जागृतावस्थेंत धातुस्राव, उन्माद, मद्यासक्ति, नपुंसकत्व, मज्जातंतूंचे अनेक रोग, उदासीनता, थकवा, सर्व गोष्टींमध्यें अनुत्साह, मित्रांशीं तुटकपणा, निद्रानाश, वाईट स्वप्नें, मलावरोध, छातींत धडधडणें, वारंवार डोकें दुखणें वगैरे. विद्यार्थ्यांचें अभ्यासाकडे लक्ष न लागून स्मरणशक्ति कमी होते. हात, पाय, डोकें, पाठ, अंड, अंडरज्जु वगैरेमध्यें वेदना होतात. डोळ्यांपुढें ठिणग्या चमकतात, हात कांपणार.

बोलतांना शब्द आठवत नाहींत. स्त्रियांमध्यें अंडाशयाचे व गर्भाशयाचे अनेक रोग ब्रह्मचर्यापासुन उद्भवूं शकतात. मनोनिग्रहाचा खरोखर प्रयत्न करणारांची सर्व शक्ति त्यांतच खर्च होऊन कोणतेंही काम त्यांचे हातून होत नाहीं. वीस वर्षांपर्यंत ब्रम्हचर्यानें बरेच फायदे होतात व फारसे तोटे नाहींत हें खरें. परंतु हे फायदे मानसिक आहेत. 'गुप्त रोगांपासून सुटका हा ब्रम्हचर्याचा सर्वांत मोठा फायदा' असें नीत्युपदेशक वारंवार सांगतात. परंतु ही चूक आहे. वीसवर्षांनंतर ब्रह्मचर्याचे परिणाम गुप्त रोगापेक्षांही भयंकर आहेत. गुप्त रोगांचा प्रतिबंध करतां येतो व ते झाल्यास बरे करतां येतात.

**प्रोफेसर डक् लिहितातः**—मी १२२ पुरुषांस ब्रम्हचर्यापासून काय वाटतें असें विचारलें, त्यांनीं पुढीलप्रमाणें उत्तरें दिलीं. त्यांपैकीं १८ ना तें अगदीं सोपें गेलें, ५४ नां बराच त्रास झाला; ३१ नीं ब्रह्मचर्य पाळलें नाहीं; व राहिलेल्या १९-नीं टाळाटाळीचीं उत्तरें दिलीं किंवा मुळींच दिलीं नाहींत, ज्या ७२ लोकांनीं सरळ उत्तरें दिलीं त्यांपैकीं ६२ निरोगी होते. तेवढेच घेतले तर त्यांपैकीं १२ ना त्रास झाला नाहीं, व ५० ना बराच त्रास झाला.

तोच प्रश्न ४२ स्त्रियांस विचारला असतां, त्यांपैकीं ८ ना त्रास झाला नाहीं, २१ ना बराच त्रास झाला, ३ नीं ब्रह्मचर्य पाळलें नाहीं, व १० नीं टाळाटाळीचीं उत्तरें दिलीं. यांपैकीं कुमारिका व रोगी वजा केल्यास राहिलेल्या २४ पैकीं ५ स त्रास झाला नाहीं व १९ स बराच त्रास झाला.

ब्रह्मचारी विद्यार्थी ( २० वर्षांपेक्षां जास्त वयाचे ) कितीही हुशार असले तरी परीक्षेला नेहमीं घाबरतात व इतर विद्यार्थी हुशार नसले तरी तितके घाबरेत नाहींत.

**डॉ. शुफेल्ट एम्. डी.** लिहितात. 'या देशांत ( अमेरिकेंत ) जे लोक आत्महत्या करतात त्यांपैकीं निदान निम्मे तरी मध्यम वयाचे विवाहित ब्रह्मचारी असतात. कित्येक मंदकाम विवाहित स्त्रियांस समागम खपत नाहीं व पुरुषांस रोगांच्या भीतीनें जबरीच्या ब्रह्मचर्यांत राहावें लागल्यामुळें कांहीं नपुंसक होतात, व कांहींस वेडही लागतें.'

**प्रोफेसर निस्ट्रोएम् एम्. डी.** लिहितातः–' स्वप्नावस्था किंवा ब्रह्मचर्याच्या इतर वाईट परिणामांवर एकच उपाय म्हटला

म्हणजे नैसर्गिक संभोग. डॉक्टरांनीं इतर उपाय हरल्यावर हा उपाय सांगितलाच पाहिजे. व त्याचबरोबर गर्भधारणा व गुप्त रोग यांचा प्रतिबंध कसा करावा, हेंही सांगितलें पाहिजे. दुर्दैवानें हें पुष्कळ डॉक्टरांसच माहीत नसतें. स्त्रियांस ब्रह्मचर्य पुरुषांपेक्षां अधिक सोपें जातें व ब्रह्मचारी कुमारिका व विधवा यांची प्रकृति पुष्कळ वेळां चांगली राहते, परंतु यावरून निश्चयात्मक कांहींच ठरवितां येणार नाहीं, कारण बाह्यतः ब्रह्मचारी दिसणाऱ्या स्त्रिया तशा असतातच असें नाहीं.'

अमेरिकेंतील कित्येक शाळांना जोडलेल्या भोजनवसतिगृहांमध्यें विद्यार्थ्यांना नीतिमार्गांत ठेवण्याकरतां मदत आणणारीं औषधें अन्नांत मिसळण्याची चाल आहे. या योगानें मुलांची तरतरी नाहींशी होऊन मुलें अत्यंत नरम व अर्थातच नीतिमान होतात. ही नीतीची कल्पना अजब आहे! त्यांच्या वाढीवर याचा अनिष्ट परिणाम होतो हें सांगणें नकोच.

ख्रिस्ती धर्माच्या कॅथोलिक शाखेंतील धर्मोपदेशकांस लग्न करण्याची परवानगी नाहीं हें सर्वश्रुत आहे. परंतु नैसर्गिक वासना धर्मतत्त्वांना थोड्याच भीक घालतात! या बंदीचा परिणाम असा

झाला कीं हे उपदेशक अंगवस्त्रें ठेवूं लागले, व त्याविरुद्ध नियम करणें भाग पडलें! त्यानंतर ते लोकांच्या बायकामुली मिळवण्याचा प्रयत्न करूं लागले, व न मिळाल्यास निसर्गविरुद्ध प्रकारांनीं कामशांति करूं लागले.

ॲरँगाँ नांवाचे एक फ्रेंच डॉक्टर एका फ्रेंच वैद्यकीय पत्राच्या १६ जून १९२३ च्या अंकांत लिहितातः-ज्या स्त्रियांनीं कधींही नैसर्गिक रतिक्रिया केली नाहीं, त्यांना मानसिक विकार, पोटदुखी, कृशता वगैरे रोग पुष्कळ वेळां होतात. अशा ५८ स्त्रियांच्या अंगांत इतर प्राण्यांच्या अंडाचा अर्क पिचकारीनें टोंचून घातल्यानें त्या बऱ्या झाल्या, यावरून हें स्पष्ट होतें कीं, जें काम योनिमार्गाच्या शुक्रशोषणानें व्हावयाचें तेंच या अर्कानें होतें. स्त्रीच्या मानसिक व शारीरिक आरोग्यास नैसर्गिक संभोगाची जरूरी असते.

डॉ. टॅनेन्बॉम् यांनीं पुरुषांच्या व स्त्रियांच्या ब्रह्मचर्याच्या कारणांची पुढील यादी दिली आहे. १. वेश्यांकडे जाण्यास येणारा खर्च. २. विवाहास व वाढत्या कुटुंबास लागणारा खर्च.

३. गर्भधारणेची भीति. ४. धर्म, नीति वगैरे. ५. वेश्यांपासून रोग होण्याची भीति. ६. विवाहित स्त्रीचा पतीपासून विरह. ७. हृदय, फुप्फुस वगैरेसंबंधीं विकार असलेल्या लोकांस प्रकृतीची काळजी. ८. विवाहित स्त्रीपुरुषांचें एकमेकांशीं न पटणें. ९. स्त्रियांस सौंदर्याची काळजी व सामाजिक व्यवसाय ( विशेषतः यूरोपांत व अमेरिकेंत ). १०. गर्भावस्थेंतील शेवटचे कांहीं महिने गर्भास इजा होण्याची भीति. ११. मेदोवृद्धि. १२. संतति नियमित ठेवण्याची इच्छा. १३. निसर्गविरुद्ध व्यवहारासंबंधीं कायद्याची भीति. १४. सामाजिक छळाची भीति. १५. स्वमैथुनामुळें प्रकृतीस इजा होण्याची भीति. १६. आधींचे दुःखप्रद अनुभव.

परंपरेच्या आणि आधुनिक शास्त्रीय ज्ञानाच्या झगड्यामध्यें ब्रह्मचर्याबद्दल आधुनिक लेखकांमधील मतवैचित्र्य दाखवण्याकरतां त्यांनीं व्यक्त केलेल्या निरनिराळ्या मतांची यादी त्याच लेखकानें दिली आहे. १. ब्रह्मचर्यानें कोणत्याही प्रकारची इजा होत नाहीं. २. कांहीं लोकांस इजा होते. ३. इजा होत नाहीं, परंतु त्यापेक्षां नैसर्गिक संभोग बरा. ४. त्यामुळें

स्वमैथुनाकडे प्रवृत्ति होते, परंतु ती रोगांपेक्षां बरा. ५. त्यानें रोगांस प्रतिबंध होतो. ६. त्यानें ३० वर्षांपर्यंत इजा होत नाहीं, परंतु पुढें मानसिक विकार होतात. ७ त्यानें कधीं कधीं स्वमैथुन, गर्भाशयोन्माद वगैरे परिणाम होतात. ८. तें आरोग्यास विरुद्ध आहे. ९. त्यानें निसर्गविरुद्ध संवयी लागतात. १०. त्यानें मनोनिग्रह वाढतो. ११. तें २५ वर्षांपर्यंत हितावह आहे. १२. त्यानें २५ वर्षांपर्यंत इजा होत नाहीं. १३. तें कोणत्याही वयांत हितावहच आहे, व त्यानें ताकद जास्त राहते १४. तें नैसर्गिक नाहीं, हितावह नाहीं आणि बहुतांशीं त्यानें स्वमैथुनाकडे प्रवृत्ति होते. १५ त्यानें वीस वर्षानंतर इजा होते, काम करण्याची ताकद कमी होते व घातुक विकार जडतात. या मतवैचित्र्यावरून खरी शास्त्रीय पद्धति या विषयास लावलेली नाहीं हेंच खरें.

**प्रोफेसर फ्रॉइड्, एम्. डी.** लिहितातः-कामवासनेचा मुख्य उपयोग प्रजाजनन नसून विषयसुख हा आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवल्यास आपल्याला पुष्कळ नवीन गोष्टी दिसूं लागतात. ही वासना लहान मुलांमध्येंही दिसून येते यावरून हें स्पष्ट दिसतें.

लहान मुलांमध्यें ही जननेंद्रियांतच असते असें नाहीं, इतर काहीं अवयवांतही असते, व यौवनाचे सुमारास जननेंद्रियांत केंद्रीभूत होते. वासनेच्या दृष्टीनें दुबळ्या प्रकृतीच्या लोकांस सामाजिक नीतीचे नियम सहज पाळतां येतात, परंतु बहुतेक लोकांना विशिष्ट मर्यादेपलीकडे हे नियम पाळणें जड जातें, व हे पाळण्याचा फाजील प्रयत्न केल्यास मज्जातंतूंचे रोग होतात. समाजामध्यें उत्तम दर्जा कमावण्याच्या उद्योगाकडे ज्या वयांत सर्व सामर्थ्य खर्च करणें जरूर असतें, त्या वयांत पुष्कळ तरुणांची शक्ति कामवासनेशीं झगडण्यांत खर्च होते. माझें असें मत झालें आहे कीं ब्रह्मचर्यानें स्वतंत्र, पाणीदार, कर्ते पुरुष, स्वातंत्र्याचे व सुधारणेचे निर्भय कैवारी न निपजतां, तेजस्वी पुरुषांचे नेभळट, अर्धवट अनुयायी निपजतात. बुद्धीच्या बाबतींत स्त्रियांच्या निःसंशय कमीपणाचें कारण कामेच्छा दडपून टाकण्यास लावणारे कडक सामाजिक निर्बंधच होत. ब्रह्मचर्याचा आणखी एक वाईट परिणाम म्हणजे समसंभोग ( म्हणजे दोन स्त्रियांचा किंवा दोन पुरुषांचा समागम ). नैसर्गिक समागमाचे अभावीं पुष्कळ लोक या आड मार्गांत शिरतात, व नंतर त्यांस नैसर्गिक

समागम पुष्कळ वेळां अप्रिय होतो. हल्लीं वाढत असलेले मज्जा-तंतूंचे रोग सामाजिक नीतीचें फळ आहे.

**डॉ. मिसेल्-हेस बाई लिहितातः**-बुद्ध म्हणतो ' काम-वासना हें आपत्तीचें एक मुख्य कारण आहे. ' भूक व तहान हीं आपत्तीचीं कारणें समजणें तितकेंच संयुक्तिक होईल ! वास्तविक पाहतां आपत्तीचें कारण कामतृप्तीच्या मार्गांतील अडचणी होत. स्त्रीपुरुषसंभोग जर ईश्वरी संकेताविरुद्ध असता तर त्यानें आप-णांस त्याचीं इंद्रियेंच दिलीं नसतीं.

**आदेल-ओबर बाई म्हणतातः**-कांहीं लेखकांची अशी समजूत दिसते कीं ब्रह्मचर्यापासून प्रकृतीस अपाय होत नाहीं इतकें सिद्ध केलें म्हणजे बस. परंतु सर्वांत प्रबल नैसर्गिक वासना दडपून टाकण्यांत किती शारीरिक व मानसिक शक्ति खर्च होते, व मनोनिग्रहाचा अपव्यय होऊन जीवित दुःखमय होतें हें ते विसरतात.

**डॉ. रटजर्स** हे रॉटरडॅम् शहरांतील आपल्या २५ वर्षांच्या अनुभवावरून लिहितातः-ब्रह्मचर्यापासून कधींही वाईट परि-

णाम होत नाहींत असें म्हणणारे लोक मूर्ख तरी आहेत किंवा धडधडीत खोटें बोलतात! माझ्या धंद्याच्या सुरवातीला मला असें वाटत असे कीं ब्रह्मचर्यापासून प्रकृति बिघडल्याचीं उदाहरणें फारच कमी. परंतु लवकरच मला असें आढळून आलें कीं खऱ्या ब्रह्मचर्याचे वाईट परिणाम झाले नाहींत असें क्वचितच. पुरुषांना हें समजून ते त्यांतून मार्ग काढतात, परंतु स्त्रियांची मात्र कठिण अवस्था होते. लवकर लग्न केल्यासच त्या बऱ्या होतात, नाहीं तर कांहीं दिवसांनीं त्यांचें लग्न सुद्धां होणें अशक्य होतें. ब्रह्मचर्याचे मनावर व मज्जातंतूंवर परिणाम होऊन वेड लागण्याची वेळ येते. कधीं कधीं अशा स्त्रिया आत्मघात करतात. वरच्या दर्जाच्या कुटुंबांतील कुमारिका अशा वेळीं नोकरचाकरांशीं व्यवहार करण्यास मागेंपुढें पहात नाहींत. अशा एका मुलीस वेड्यांच्या इस्पितळांत पाठवण्याचें ठरलें असतां अकस्मात तिचें लग्न जमल्यानें ती एकदम बरी झाल्याचें मला माहीत आहे. मुलींच्या बाबतीत कामेच्छा बरेच दिवस दाबली गेल्यामुळें कधीं कधीं साफ नाहींशी होते. तरी सुद्धां प्रकृतीवर परिणाम होतोच.

**डॉ. लोप्वेनफेल्ड** म्हणतातः-ब्रह्मचर्याचे वाईट परिणाम २५ वर्षांचे आंत फारसे दिसत नाहींत. २५ पासून ३५ व्या वर्षापर्यंत अधिक दिसतात.

**डॉ. हिर्शफेल्ड** व **ब्लॉख** म्हणतातः-ब्रह्मचर्याचे परिणाम हा शारीरशास्त्राचा प्रश्न आहे, व याचा विचार करतांना इतर सर्व गोष्टी बाजूला ठेवल्या पाहिजेत...ब्रह्मचर्यापासुन होणाऱ्या रोगांवर नैसर्गिक समागमाशिवाय इतर कोणतेही उपाय चालत नाहींत.

**डॉ. ब्लॅश्को** म्हणतातः-ब्रह्मचर्याचा विचार करतांना कामवासनेची तीव्रता व आत्मसंयमनाची शक्ति या दोन गोष्टी लक्षांत घ्याव्या लागतात. ४० वर्षे सुखानें संसार करणाऱ्या विवाहित स्त्रीचा कौमार्यभंग झालेला नाहीं असें एक उदाहरण मीं पाहिलें आहे. व वर्षाच्या ३६५ दिवसांत एक दिवसही सुना गेल्यास ज्यांना कसेंसेंच होतें असेही लोक मीं पाहिले आहेत. पहिल्या दंपत्यास फारसें आत्मसंयमन करावें लागलें नाहीं हें उघड आहे. दुसऱ्या प्रकारच्या लोकांस ब्रह्मचर्य अत्यंत कठिण होईल. ब्रह्मचर्यापासुन ज्यांना अपाय होतो अशांचीच संख्या अधिक.'

**डॉ. श्मिट्** म्हणतातः-कोणतीही स्वाभाविक प्रवृत्ति जोरानें दाबून टाकल्याचे परिणाम अनिष्टच होणार. जुलुमाच्या ब्रह्मचर्याचे परिणाम गुप्त रोगांपेक्षां कमी भयंकर नसतात. तेव्हां गुप्त रोगांचा प्रतीकार ब्रह्मचर्याच्या उपदेशानें करूं पाहण्यापेक्षां रोगांपासून बचावाचे उपाय सांगणें बरें.

**डॉ. ष्टेकेल्** लिहितातः-समागमाचा विचारही मनांत आला नाहीं असा एकही निरोगी पुरुष किंवा स्त्री जगांत नाहीं. कांहीं स्त्रिया समाजिक परिस्थितीमुळें तसें सांगतात, परंतु तें साफ खोटें...विवाहापूर्वी ब्रह्मचर्यानें रहावें असें म्हणतात. विसाव्या वर्षी लग्न करणें शक्य असतें तर मींही तसेंच म्हटलें असतें या स्वनिर्मित समाजनीतिरक्षकांपैकीं किती बोलल्याप्रमाणें वागतात हें पाहिल्यास बरीच करमणूक होईल. स्वतः तरुणपणीं पाहिजे तशी चैन करून म्हातारपणीं वैराग्याच्या गोष्टी सांगणें कठिण नाहीं. टॉल्स्टॉय् तरुणपणीं अत्यंत चैनी होता व त्यावेळीं त्याला बरींच मुलेंही झालीं. हे ब्रह्मचर्याचे कैवारी जर डोळे उघडून पाहतील, तर त्यांना ब्रह्मचर्यानें शरीराची कशी हानि होते हें खास दिसेल. ब्रह्मचर्यानें प्रकृति चांगली राहिली असा एखादा. त्यानें प्रकृति साफ ढांसळली, असेच फार.

' नियमित समागमानें देखील प्रकृतीस अपाय होतो ' हें विधान साफ खोटें आहे. एक ३० वर्षांच्या सुदृढ, सशक्त मनुष्यास एका डॉक्टरानें ' ब्रह्मचर्यानें राहिल्यास जास्त जगशील ' असें सांगितलें. तो मनुष्य ब्रह्मचर्यामुळें ४० व्या वर्षींच रोगट व क्षीण होऊन बसला ! ब्रह्मचाऱ्यांपेक्षां कामवासना नियमितपणानें तृप्त करणारे लोकच अधिक जगतात.

डॉ व्हेका लिहितातः—जे कडक ब्रह्मचारी असतात त्यांपैकीं बहुतेकांची कामवासनाच तीव्र नसते......वेश्यांचा नायनाट करूं पाहणाऱ्या समाजसुधारकांच्या उद्योगाचा परिणाम इतकाच होतो कीं वेश्यांना आपला धंदा चोरून करावा लागतो; व पुष्कळ बाहेरख्याली लोक कुमारिकांच्या किंवा विवाहित स्त्रियांच्या मागें लागतात. कामवासनेची एक वाट बंद केल्यास लोक दुसरी पाहतात. इतरांस आत्मसंयमनाचा उपदेश करणारे पुष्कळ असतात.

नैसर्गिक नियमांस नीतीची पर्वा नसते.



# पुरवणी २ री.



## माल्थसचे प्रतिपक्षी.

अलीकडे कार-सॉंडर्स व इतर लेखकांनीं लोकसंख्या किती असावी हें ठरविण्याची एक नवीनच युक्ति काढली आहे. ते ह्मणतात देशांत उद्योगधंद्याची भरभराट होण्यास पुरेशी लोकसंख्या असली पाहिजे, मग लोकांस अन्न पुरेसें मिळतें कीं नाहीं हें पाहण्याचें कारण नाहीं! आमचे मतें हें म्हणणें चुकीचें आहे इतकेंच नव्हे तर भयंकर आहे. मागें सांगितलेंच आहे कीं कारखान्यांची भरभराट मजूर स्वस्त झाल्यानें होण्याचा संभव आहे परंतु त्यानें देश सुखी होणें शक्य नाहीं. उद्योगधंद्यामुळें देशांत (श्रीमंतांजवळ) पैसा जास्त होईल, परंतु गरीब उपाशीं मरतील. लढाईपूर्वी जर्मनीची औद्योगिक स्थिति फ्रान्सपेक्षां पुष्कळ चांगली होती. परंतु जर्मन मजुरांची स्थिति फ्रेंच मजुरांपेक्षां अत्यंत वाईट होती. हॉलंडमधील मजुरांची स्थिति यूरोपांतील इतर सर्व देशांपेक्षां चांगली आहे. परंतु औद्योगिक दृष्टीनें हॉलंडचा पहिला नंबर नाहीं. माल्थसूच

म्हणणें आपण खोडून काढलें अशी कार–सॉंडर्स व त्यांच्या अनुयायांची कल्पना आहे. ती किती भ्रममूलक आहे याची या दोन उदाहरणांवरून कल्पना येईल. मालथस्च्या म्हणण्यांतील मुख्य मुद्दा अजूनपर्यंत कोणी खोडून काढलेला नाहीं व पुढेंही काढीलसें दिसत नाहीं. विपुल अन्न असेल तरच देश सुखी होणें शक्य आहे व केवळ कारखाने वाढल्यानें अन्न वाढत नाहीं.

मालथसचे आणखी कांहीं प्रतिपक्षी असें म्हणत असतात कीं लोकसंख्या जास्त वाढल्यानें शेती करण्यास जास्त माणसें मिळतील व त्याच शेतांतून जास्त उत्पन्न काढतां येईल. त्याच शेतावर शंभरपट माणसें खपलीं असतां त्यांतून शंभरपट उत्पन्न निघेल अशी या लोकांची कल्पना दिसते! परंतु कितीही खत व कितीही मजुरी लावली तरी एका शेतांतून विशिष्ट मर्यादेपलीकडे उत्पन्न निघूं शकत नाहीं हा अर्थशास्त्राचा सर्वमान्य सिद्धांत ते विसरतात. ( हा मुद्दा मालथसच्या पुस्तकांत दिला नाहीं ).



# पुरवणी ३.



## संस्कृत उतारे.

पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत सांगितलेले बृहद्योगतरङ्गिणींतील श्लोक येणें प्रमाणेः—

तालीसगैरिकं पीतं बिडालपदमात्रकम् ।
शीताम्बुना चतुर्थेऽन्हि वन्ध्यां स्त्रीं कुरुते भृशम् ॥ १ ॥
पलाशबीजमध्वाज्यलेपात्सामर्थ्ययोगतः ।
योनिमध्य ऋतौ गर्भं न धत्ते स्त्री कदाचन ॥ २ ॥
धूपिते योनिरन्ध्रे तु निम्बकाष्ठेन युक्तितः ।
ऋत्वन्ते रमते या स्त्री न सा गर्भमवाप्नुयात् ॥ ३ ॥
तैलाविलं सैन्धवखण्डमादौ निधाय रण्डा निजयोनिमध्ये ।
नरेण सार्धं रतमातनोति या सा न गर्भं लभते कदाचित् ॥४॥
धत्तूरमूलिका पुष्ये गृहीता कटिसंस्थिता ।
गर्भं निवारयत्येव रण्डावेश्यादि योषिताम् ॥ ५ ॥

तण्डुलीयकमूलानि पिष्ट्वा तण्डुलवारिणा ।
ऋत्वन्ते त्र्यहपीतानि वन्ध्याः कुर्वन्ति योषितः ॥ ६ ॥

राजिकं तिलतैलं च पिष्ट्वा नारी ऋतौ पिबेत ।
त्रिदिनं तेन गर्भस्य संभवो नैव जायते ॥ ७ ॥

पिबति प्रसूतिसमये काञ्जिकयुक्तं जपाभवं पुष्पम् ।
न बिभर्ति सा प्रसूतिं धृतेऽपि तस्या न गर्भः स्यात् ॥ ८ ॥

मृतप्रिया प्रोषितभर्तृका या सुखेन सर्वैः सुरतं करोतु ।
पश्चाद्भगे सैन्धवदीप्यतैलैरगर्भदां पोटलिकां ददातु ॥ ९ ॥

पुढील दोन श्लोक गर्भपातासंबंधीं आहेत.

जाता सगर्भैव यदा तदा सा गर्भस्य पातं सहसा करोतु ।
सदुग्धहिङ्गुसुपलाशबीजमपि प्रपीत्वा ननु गोप्यमेतत् ॥ १० ॥

गृञ्जनस्य च बीजानि तिलक्षारविके अपि ।
गुडेन भुक्तमेतत्तु गर्भं पातयति ध्रुवम् ॥ ११ ॥

याशिवाय इतर ग्रंथांतील कांहीं श्लोक येथें देतों.

नापेक्षितायां जायायां संततौ कामिनो जनाः ।
संभोगार्थं हि कुर्वन्ति वंध्यात्वं रमणीषु च ॥ १ ॥

पिप्पलिविडंगटंकणसमचूर्णं या पिबेत् पयसा ।
ऋतुसमये नहि तस्या गर्भः संजायते क्वापि ॥ २ ॥
आरनालपरिपेषितं ध्रुवं या जपाकुसुममत्ति पुष्पिणी ।
सा पुराणगुडमुष्टिसेवनात् संदधाति नहि गर्भमंगना ॥ ३ ॥
कांजिकेन जपापुष्पं नित्यं पिबति यांगना ।
ऋतौ पुष्पं न धत्ते सा धत्ते वा स्यान्न गर्भिणी ॥ ४ ॥
धूपितं निंबकाष्ठेन योनिरंध्रं च युक्तितः ।
ऋत्वंते रमते सा च गर्भदुःखविवर्जिता ॥ ५ ॥

[ युक्तिस्तु करकमध्ये दीप्तांगारान्निक्षिप्य तत्र निंबकाष्ठचूर्णं निक्षिप्य तत्करकास्यं पिधानादिना संगुप्य तन्नालं योनौ प्रवेशयेदिति ]

कदंबस्य फलं पादं मक्षिकाया दिनत्रयं ।
पीतमुष्णोदकेनैव वंध्यात्वं प्रतिपादयेत् ॥ ६ ॥
गुडं त्रैहायनं जातीफलमात्रं तु नित्यशः ।
मासार्धमद्यात् सा वंध्या यावदायुर्भवेद् ध्रुवं ॥ ७ ॥
तुषतोयेन संक्वाथ्य मूलमग्नितरूद्भवं ।
पुष्पावसाने त्रिदिनं पीत्वा वंध्यापि जायते ॥ ८ ॥

चंदनं सर्षपाश्चैव शर्करा समभागका ।
तंडुलोदकसंपीता रामा वंध्या भवेद् ध्रुवं ॥ ९ ॥
रक्षोभूरुहबीजानि पलार्ध तंडुलांबुना ।
ऋतौ पीतानि सप्ताहात् वंध्यां कुर्वंति योषितां ॥ १० ॥
जंबूलवृक्षपुष्पाणि गोमूत्रेण पिबेदृतौ ।
या नारी गर्भसंभूतिः पुनस्तस्या न जायते ॥ १२ ॥
वालकचंदनसहितं कुटजवदंबोद्भवं फलं पिबति ।
आसवमिश्रं कांता या सा वंध्या भवेन्नियतं ॥ १३ ॥



# या पुस्तकावर आणखी एक अभिप्राय.



......आपलें पुस्तक मीं मनापासून व लक्षपूर्वक वाचलें. वाचीत असतां त्यांतील प्रतिपादनानें विषय मनावर चांगला ठसतो असा अनुभव आला. तरुण स्त्रीपुरुषांना योग्य ती दिशा दाखविण्यास हें पुस्तक उपयोगी आहे. गर्भधारणेसंबंधाची माहिती स्पष्ट, सोप्या व चांगल्या रीतीनें दिली आहे. तसेंच पान २७,५४ व ६३ च्या शेवटी स्त्रीवर्गासंबंधीं लिहिलेला मजकूर मननीय आहे व तो पुरुषांनीं लिहून प्रसिद्ध करण्यानें वाचकांवर अधिक परिणाम करील म्हणून त्याचा उल्लेख करावासा वाटला. निसर्गदृष्ट्या स्त्रियांच्या बाबतींत खरें काय आहे, तें चांगल्या भाषेत व्यक्त केलें आहे. ज्यांचा कल विचारशीलतेकडे आहे त्या स्त्रीपुरुषांना आपल्या पुस्तकाच्या वाचनानें पुष्कळ फायदा होईल. आचार ह्या भागासंबंधानें स्त्रीवाचकांचा एखादेवेळीं मतभेद होऊं शकेल पण तो झाला तरी विचारजागृतीला पोषक होईल म्हणून कांहीं

हरकत नाहीं. पुस्तकांत कोठेंही पाल्हाळ नसुन, भाषा सभ्य, चांगली व विषयाची माहिती सुलभ व भरपूर आहे...... तरुण पिढीला योग्य बाबतींत मार्गदर्शक व विचार करावयास लावील असें हें लहानसें पुस्तक लिहून आपण ह्या युगांतलें एक योग्य कर्तव्य केलें आहे असें मला वाटतें.... विचारशील मातृत्व हें स्त्रियांच्या शिक्षणाचें व जन्माचें सार्थक होय. मानवेतर व मानवी आई यांच्यांत खरा फरक ' विचारशील मातृपद ' हाच होय. आपल्या देशांत स्त्रीशिक्षणाचा प्रसार बराच होत आहे, अशावेळीं स्त्रियांना स्वकर्तव्याचें ज्ञान होण्यास या पुस्तकाची मदत होईल. हॉलंड् देशाचें उदाहरण दिलेलें मोठें अनुकरणीय वाटलें............

पुस्तक पाठविल्याबद्दल मी आपली आभारी आहें.

२२–७–२५. काशीबाई हेरलेकर.